






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२७३०

वर्ष ११वे - १९३८.
अं. ४१-४२-४३-४४.

संपादक - मोहन ज्ञानेश्वर शहाणे

वर्ष ११ वे अंक १ (४१) फेब्रुवारी १९३८
वर्ष ११ वे अंक २रा (४२) एप्रिल १९३८
वर्ष ११ वे अंक ३रा (४३) जुलै १९३८
वर्ष ११वे अंक ४था (४४) ऑक्टोबर १९३८

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[ त्रैमासिक ]

## ४१

संपादक—मोहन ज्ञानेश्वर शहाणे
( सदस्य, सर्व्हंण्ट्स् ऑफ इण्डिया सोसायटी )

माघ १८५९

वर्ष ११ वें ] फेब्रुवारी १९३८ [ अंक १

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष ११ वें ] [ अंक १

## अनुक्रमणिका

# कुडाळी म्हणींची चर्चा

(लेखक—बाळकृष्ण रामचंद्र प्रभु, बी. अे.)

कोकणांत ज्या चित्पावनी, गोव्याची, बाणकोटी वगैरे बोली प्रचलित आहेत त्यांत कुडाळी हीहि अेक आहे. ह्या अुपभाषेविषयी महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेंत अेकदा चर्चा येअून गेली आहे. ही भाषा केवळ कुडाळदेशकर ब्राह्मण किंवा आद्यगौड ब्राह्मण या दोन अर्वाचीन अगर प्राचीन नांवांनी ओळखिल्या जाणाऱ्या अेका ब्राह्मणसमाजाची घरची बोली आहे अशीहि कित्येकांची समजूत आहे. पण ती प्रान्तविशिष्ट बोली आहे हें 'कुडाळी' या तिच्या सरकारमान्य नांवावरूनहि बोधित होण्यासारखें आहे. अिथे फक्त त्या भाषेतील म्हणींची चर्चा करण्याचें योजिलें आहे. महाराष्ट्र-शब्द-कोशाने ह्या भाषेतील शब्द गोळा केले आहेत; तशा म्हणीहि अिथे चर्चिल्या की त्यांचा मध्य-मराठी भाषेला फायदा होणार आहे. कारण त्यांना योग्य तः संस्कार करून मध्य-मराठीमध्ये रूढ करतां येतील.

१. बारा वर्सांचे धुवेन आललो करो, आवस म्हणता माझो कुसवो बरो : या म्हणीमध्ये मुलीचें अवास्तव कौतुक करणाऱ्या एका बाअीचा अुपहास केला आहे. वधू बारा वर्षांची आहे व लग्नांत जो करा असतो, तो तिने कोणाचेंहि साहाय्य न घेतां उचलला म्हणून आअी म्हणते की माझ्या कुशीला जन्माला आल्याचें हें फळ आहे. ह्या म्हणीचें मध्यमराठी भाषेतील रूप असें होईल : बारा वर्षांच्या वधूने अुचलला करा, आई म्हणते माझा कुसवा बरा.

२. दिवाणांचा त्याल, पदरांत घेंवचा : कित्येक लोकांना, विशेषतः देवाकडे चाकरी करणारांना, सरकारांतून (दिवाणींतून) तेल मिळत असे. सरकारी काम दिरंगाअी केल्यास मागाहून होत नाही. म्हणून सरकारांतून तेल न्या असें म्हणतांच, आपल्याजवळ जर भांडें नसेल तर तें अुपरण्याच्या पदरांतहि घ्यावें. म्हणीचें सुसंस्कृत स्वरूप : दिवाणांतील तेल पदरांत घ्यावें.

३. गुरवाचीं शातां परसादाक गेलीं : कुडाळ प्रांतांतील १८ गांवांशिवाय इतर गांवीं, कित्येक ठिकाणीं गुरव पुजारी असतो. त्याला प्रसाद द्यावा लागल्यामुळे व प्रसाद घेणाऱ्यांनी देवाला कांहीच न दिल्यामुळे त्या गुरवाचीं शेतें खलास झालीं असा या म्हणीचा आशय आहे. मोबदला न घेतां, परोपकार करणाऱ्या व दिवाळें वाजविणाऱ्या गृहस्थास ही म्हण लावतात. म्हणीचें मध्य-मराठी स्वरूप : गुरवाचीं शेतें प्रसादाला गेलीं.

४. होते आंबे-गरे तंवसर भट-बामण बरे : कुडाळ प्रान्तांत ६०० वर्षांऱ्याहि पूर्वी कुडाळदेशकर ब्राह्मण या नांवाने आज नामांकित असलेल्या गौड ब्राह्मणांनी अुत्तरेंतून येअून वसाहत केली. ते बहुसंख्य असल्यामुळे, मागाहून आलेल्या अल्पसंख्य अशा व केवळ याज्ञिकीने राहणाऱ्या कऱ्हाडे व चित्पावन ब्राह्मणांस त्या प्रान्तांत 'भट' अशी संज्ञा मिळाली व गौड ब्राह्मणांचें "बामण" असें रूप राहिलें. जुन्या कागदांत कुडाळ देशकर ब्राह्मण ज्या ठिकाणीं "गांवकर" असतील त्या ठिकाणीं सह्या करतांना, भिन्नत्व दाखविण्यासाठी "ब्राह्मण" असें लिहीत. त्याचाच पुढे अपभ्रंश 'बामण' असा

लौकिकभाषेंत व "बामणदंड" या आसुरी करांत पाहावयास सापडतो. अेवढें विवरण करण्याचें कारण असें की 'बामणं' (सानुस्वार) हा शब्द देशावर देशस्थ या अभिधानाने ओळखिल्या जाणाऱ्या द्रविड ब्राह्मणांस लावण्यांत येत असल्यामुळे 'भट-बामण' ही द्विरुक्ति करण्याचा संभव आहे; तशी ती द्विरुक्ति नाही. म्हणीचा अर्थ अेवढाच आहे की चैत्र वैशाख महिन्यांत आंबे व गरे पुष्कळ असतात व त्यामुळे शिष्ट लोक संतुष्ट असतात. संपत्ति असेपर्यंत लोकांची मर्जी आपल्यावर असते असा गर्भितार्थ आहे. म्हणीचें शिष्टसंमत स्वरूप असें होओील:—होते आंबे-गरे, तोंपर्यंत भट-ब्राह्मण बरे.

५. अगा अगा देसाया काही नाही नेसायां : वरच्या चर्चेत जो 'ब्रामणदंड' अुल्लेखिला आहे तो केवळ या ज्ञातीवर बसविण्यांत येअून, या ज्ञातींतील पूर्वीचे जे सत्ताधारी पांच देसाअी ते डबघाअीस आले व त्यांपैकी कांही भिकारी झाले. यामुळे देसाअी हें सत्तेचें नांव धारण करणारा पण नेसायला लंगोटीसुद्धा नाही असा या म्हणीचा अर्थ आहे. सर्वच देसाअी असे निकृष्ट स्थितीला गेले नाहीत व जे गेले त्यांपैकी श्रीमंत शेट टोपीवाले यांजसारखे कोट्याधीश दानशूर निपजले व कै. अच्युतबापू कुंभवडेकर यांसारखे मोठे सरकारी अधिकारी झाले. यामुळे या म्हणींतील विषारीपणा गेला आहे. व ती सर्वांसच आज लावतां येण्यासारखी झाली आहे. शिष्टस्वरूप तेंच राहूं शकेल.

६. आद्वेची जोडले आणि पिढयेची मोडले सारखे नाय : वरचा जो अेक निकृष्ट काळ सांगितला त्या काळीं इतर कांही लोक पुढे आले. त्या वेळीं नवीन अुत्कर्ष पावलेलीं माणसें हीं पिढीजाद पण ऱ्हास पावलेल्या माणसांच्या योग्यतेचीं नसतात असें आत्मसमर्थन होऊं लागलें. आता ती स्थिति पालटल्याने म्हणहि सार्वत्रिक झाली आहे. तिचें मध्य-मराठीमध्ये रूपान्तर असें होईलः—आजचा जोडला व पिढीचा मोडला, सारखा नव्हे.

७. जांवयाची जात आणि न्हाणयेंतला खात : "न्हाणयेंतला" ह्याबद्दल "न्हाणींतला" हा शब्द लिहिला की हीच म्हण सर्व महाराष्ट्रांत वापरायला हरकत नाही. पूर्वी जांवई त्रासदायक असत. ते रुसून सासऱ्यांना त्रास देत. म्हणून त्यांना 'खात' म्हणजे चिखल याची अुपमा दिलेली आहे. कुडाळ प्रांतांत समुद्रालगतच्या ८।१० मैलांच्या भागाला "खालाट" म्हणतात. तिथे नारळीच्या झाडांचें महत्त्व असतें. नारळीचें अेक झाड मागच्या दारीं लावलेलें असतें व जी आंघोळीची जागा—न्हाणी—तिचें पाणी त्याला सोडतात. यामुळे न्हाणीचें पाणी वाहून न जातां तिथे चिखल होतो व आंघोळ करतांना अंगावर अुडतो. म्हणून जांवयाचा फायदा करावयाला जावें तों तो अंगावर अुलटतो असा अर्थ रूढ झाला.

८. शेरभर वरयो घ्या आणि गांवकरीण म्हणा : कुडाळ प्रान्तांत पूर्वी ग्राम-सत्ता अेका विशिष्ट कुळांत असे, आतां ती मर्यादित झाली आहे. त्या काळीं 'गांवकर' व त्या कुळांतील कोणत्याहि स्त्रीला 'गांवकारीण' (गांवकरीण) असें म्हणण्याचा प्रघात आहे. या म्हणीमध्ये जी बाअी स्वतः अधिकारी नाही ती 'शेर वरी' देअून आपणांस गांवकरीण म्हणा असें सांगत आहे. नसता खटाटोप करून आपल्याला प्रतिष्ठितपणा मिळवायचा नसला कीं ही म्हण लावतात व असा अुलट अुपयोग करतात. शिष्टमान्य रूप : अेक शेर वरी घ्या व गांवकरीण-म्हणा.

९. मळ्यो मासो लागलो तोंडा चल गा भावो कालच्या कोंडा : माशांच्या अनेक ज़ाती आहेत. त्यांपैकी 'सावे' व 'खारे' अशा दोन. 'सावे' मासे खाडींत अगर गोड्या पाण्यांत असतात व खारे हे समुद्रांत सापडतात. 'साव्या' माशांपैकी "मळ्या मासा" ही अेक जात आहे. हा काळा मासा असून चिखलांत असतो. तो रुचकर असें मत्स्याहारी लोकांचें मत आहे. व विशेषतः हे 'सावे' मासे "कोंडींत" म्हणजे पाण्याच्या डोहांत सापडतात. अेक मेहुणा आपल्या भावोजीच्या घरीं आला होता. त्याला आदल्या दिवशीं "कोंडां"तून आणलेल्या माशांची गोडी लागल्यामुळे त्या कालच्या डोहांत मासे मारण्याकरता जाअुंया असें तो मेहुणा सांगत आहे. सवअीचा अगर रुचीचा परिणाम कसा होतो तें दाखविण्याकरिता या म्हणीचा अुपयोग होतो. सुसंस्कृत स्वरूप : "मळ्या मासा लागला तोंडा, चल गा भावोजी कालच्या डोहा (कोंडा)."

१०. जा गे मांडी तर ये गे डावी : 'मांड' हें अेक लाकडाचें भांडें आहे. तें रुंदट आकाराचें व चपटें असतें. 'डाव' हेंहि अेक लाकडी भांडें आहे. तें चमच्याच्या आकाराचें असतें व मोठे चमचे चार पांच राहतील अेवढें मोठें असतें. या दोन भांड्यांपैकी 'मांड' हें मोठें भांडे असतें. ज्या वेळीं आपण मोठें भांडें भरून कांहीं वस्तु दुसऱ्याला विनमोबदला देतों त्या वेळीं दुसऱ्याकडून आपणांस लहान भांडें भरून फुकटची वस्तु मिळते म्हणींचें शिष्टसंमत स्वरूप तेंच राहूं शकेल.

११. अगांची पगा व अुतवाक ढ्यांगा : ह्या म्हणींतील पहिल्या दोन शब्दांचा अर्थ समजत नाहीं. 'उतव' ही अेक घोंगडी वाळत घालण्याची सपाट चौकट असते. ती उंच जागीं असते. 'ढेंगे' म्हणजे 'तंगड्या'. उतवाला 'ढेंगे' लागणें शक्य नाहीं. यावरून 'पराचा कावळा' असा अर्थ झाला. प्रत्येक शब्दाचा अर्थ मिळत नाहीं म्हणून शिष्टसंमत रूपान्तर देणें कठीण.

१२. काजुली करी थिस्स, काढ रे झिला आगवीस : काजुली=काजवा. थिस्स= चकचकणें. झिला=मुला (संबोधन). आगवीस=शेतांत पसरलेल्या पातेऱ्यास अेका बाजूने विस्तव लावणें. काजवे चमकूं लागले की पाअूस येतो. व पाअूस पडला तर शेतांत जाळण्याचा पातेरा भिजतो. म्हणून काजवे चमकतांच त्याला आग लावली पाहिजे. पूर्वचिन्हांवरून आगामी गोष्टींची अटकळ करून कार्य साधावें असा म्हणीचा अर्थ आहे. मध्यमराठी स्वरूप : काजवा करी थिस्स, काढ रे मुला आगवीस.

१३. कित्या को विलू येराझारी। भाग्य अिलां आमचे घरीं : ज्या वेळीं अेखादा खाण्याचा पदार्थ व विशेषतः मांजराला आवडणारा पदार्थ घरीं येतो त्या वेळीं मांजर पायांला घांसतें व येरझारा घालतें. त्याचा अुद्देश आपणांस तो पदार्थ मिळावा असा असतो. 'विलू' मांजराला अुद्देशून शब्द आहे. अिलॅं म्हणजे आलें. या म्हणीचें मध्य-मराठी भाषेंतील स्वरूप पुढे दिल्याप्रमाणे बनवितां येअील : कां रे बोक्या येराझारी। भाग्य आलें आमुचे घरीं ॥

१४. हिसबी नाडता, आणि पेवणार बुडता : केन्हा केन्हा हिसबी म्हणजे हिशेबी मनुष्य चुकत असतो. तसेंच पोहणारा मनुष्य बुडतो. कितीही हुषार मनुष्य असला किंवा आपल्या कार्यांत पटुत्व संपादिलेला असला तरी तो चुकण्याचा संभव आहे असें ही म्हण सुचविते. अेखादा मनुष्य आपल्या कामाबद्दल वढाअी दाखवूं लागला तर ही म्हण योजतात. हिचें शुद्ध स्वरूप असें होअील : हिशेबी नडतो व पोहणारा बुडतो.

१५. संवांकलो क्रोलो अजिर्णान् मेलो : संवाकलो=सवअी लागली. कोल्हो=कोल्हा. अजिर्णान्=अनिर्णाने. मेलो=मेला. ह्या म्हणींमध्ये 'अजिर्णान्' या शब्दाबद्दल अेक ग्राम्य शब्द आहे तो काढून टाकला आहे व त्या शब्दाचें कार्य करणारा शब्द योजिला आहे. सवअीमुळे अेका कोल्ह्याने आपणांस आवडणारा पदार्थ खाल्ला व शेवटीं तो अजीर्ण होऊन मेला. फाजील सवअीमुळे काय परिणाम होतो तें दाखविण्यासाठी ही म्हण योजतात. शिष्टसंमत स्वरूपः—सवअी झालेला कोल्हा अजिर्णाने मेला.

१६. दिव्यांत वात नि तोंडांत हात : ही म्हण दिवा लावल्याबरोबर जेवणारांना अुपहासाने योजतात. रात्रौ उशिरा जेवणें हें खर्चिकपणाचें, चैनीचें व पर्यायाने श्रीमंतीचें लक्षण पण दिवा लागल्याबरोबर जेवणें हें मात्र कंजुषपणाचें लक्षण अशा तऱ्हेची समजूत असल्यामुळे ही म्हण प्रचारांत आली. ह्या म्हणीमध्ये व शिष्टसंमत भाषेमध्ये कांहीच फरक नाही. म्हणून हिचें निराळें रूप रूढ न करतां, तेंच रूप रूढ करणें योग्य.

१७. येळार येळ आणि शिमग्यांत खेळ : प्रत्येक गोष्टीला अेक ठराविक काळ असतो. अुदाहरणार्थ, शिमग्यांत जर सोंगें आणलीं व निरनिराळे खेळ केले तर ते शोभून दिसतात. पण अितर वेळीं ते शोभून दिसत नाहीत. कोणत्याहि गोष्टीला योग्य असा अेक काळ असतो, व त्या काळीं ती शोभून दिसते. 'येळार येळ'=वेळावर वेळ. या म्हणींतील "वेळावर वेळ" या शब्दांचा शब्दशः अर्थ करतां येणार नाही. म्हणून तिचें शब्दशः शुद्ध स्वरूप करतां येणार नाही. पण ते शब्द तसेच ठेवून सुसंस्कृत स्वरूप असें होअील : वेळावर वेळ व शिमग्याला खेळ.

१८. माडाची सावली, प्वॉट आवळी. समुद्रालगतच्या गांवांतून बरेच "माड" (नारळी) असतात. तिथे सूर्याचें दर्शन होणें मुष्कील असतें. अशा ठिकाणीं राहणाऱ्या लोकांचें आयुष्य अुन्हांत राहणाऱ्या लोकांपेक्षा कमी कष्टाचें असतें. माडाच्या बागांतून कष्टाचें काम सुखावह असतें, व तिथे राहणें पथ्यकर असतें अशी गोष्ट ही म्हण सुचविते. प्वॉट=पोट. आवळी=गच्च धरते. "प्वॉट आवळी" या दोन शब्दांचा वाच्यार्थ घेतला तर पोट गच्च धरते असा होतो. पण तो वाच्यार्थ न घेतां पोटाला सुखावह होतें असा व्यंग्यार्थ घ्यावा हें बरें. ह्या म्हणीचें महाराष्ट्रासाठी रूप बनवितांना ते शब्द कायम ठेवले तरी चालतील. 'माडाची सावली, पोट आवळी' असें बृहन्महाराष्ट्राच्या अपयोगासाठी रूप बनेल.

१९. कुणब्याकडे दिलां जवादयां, त्याणां खाल्लां आंवलीबरोबर : कुणबी ह्या शब्दाची चलती कुडाळ प्रान्तांत नाही. त्याच्या अैवजी 'कुळवडी' हा शब्द वापरतात व क्वचित् हा शब्द वापरतात. कदाचित् ही म्हण फिरत फिरत आली असेल. 'जवादयां' हें अेका प्राण्याचें नांव. त्याचें जें वर्णन जानपदांत चालू आहे त्यावरून 'घोरपड' ह्या अितिहासप्रसिद्ध प्राण्याला हा प्रतिशब्द योजलेला दिसतो. आंबील हा नाचण्यांचें अगर 'वरी' ह्या धान्याचें पीठ आंबवून नंतर ताजें पीठ कढवून तयार केलेला पदार्थ. 'अंबील' या शब्दाचा 'झेंडूचीं फुलें' ह्या पुस्तकांत विनोदाचार्य अत्रे यांचा "माशांचें कालवण" हा अर्थ अिथे अभिप्रेत नाही व तसा अर्थ ह्या प्रान्तापुरता तरी रूढ नाही. ज्या कुणब्याला लढाअीची माहिती नाही, तो घोरपडीचा उपयोग तोंडीं लावण्यासाठी करील. तोंडीं लावण्याचा कार्यक्रम अेकदम न घडतां त्या घोरपडीला ठार मारून होअील हें सांगावयाला नको. 'जवादयां' या

प्राण्याचें तेल औषधीहि असतें. त्याला अुद्देशूनहि ह्या म्हणीचा अुपयोग होतो. दिलां=दिलें. त्याणां=त्याने. खाल्लां=खाल्लें. ह्या म्हणीचें शुद्ध स्वरूप : कुणब्याकडे दिली जवाद (अगर घोरपड) त्याने खाल्ली आंवलीवरोबर.

२०. शेटीचां आणि माझां अेकोतरशें : ही म्हण मूर्ख माणसाला लावतात. मूर्ख व हेवा करणारा मनुष्य मोठ्या माणसाशीं आपली तुलना करतो. अेक मनुष्य अेक रुपया घरीं घेअून व शेटजवळ १०० रुपये असतील आपणाजवळ अेक व शेटजवळ १०० म्हणून आपण १०१ शेट असा तर्क करतो. यावरून ही म्हण पडली आहे. शेटीचां=शेटचें. माझां=माझें. हिचें सुसंस्कृत स्वरूप : "शेटीचें व माझें अेकोतरशें" असें होअील.

२१. नवी नवतार, बसली गवतार : 'नवतार' हा ह्या म्हणीमधला शब्द "नवधर" ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा. नवी बाअी आपल्या मोठेपणाच्या डौलाने गवतार बसली. गवताच्या गंजीवर आसन घालणें हें खुळेपणाचें लक्षण आहे. त्या म्हणींतील गोष्ट घडली असेल असें नाही व यांत विशेषसा कार्यकारणभावहि नाही. 'तार' ह्या प्रासासाठी ह्या म्हणींतील दुसऱ्या अर्धाचा जन्म झाला असावा. हिचें सुसंस्कृत स्वरूप : नवी नवधर, बसली गवतावर.

२२. धर झिला घाल घोंगड्यांत : कोणतेंहि काम घिसाडघाईनें केलें की ह्या म्हणीचा अुपयोग करतात. अेक बाप आपल्या मुलाला अेक वस्तु घेअून ती लगेच कांबळीमध्ये (घोंगडीमध्ये) टाक असें सांगत आहेत. म्हण आटोपशीर आहे. पण चटकन अुच्चारावयाची आहे, यामुळे कार्यांतील घाअीचा बोध होतो. या म्हणीचें मध्यमराठी रूपांतर : धर मुला, घाल घोंगडींत.

२३. मेल्याचीं ढ्यांगां खालतीं काय वरतीं : मेल्याचीं= मेलेल्याचीं. ढ्यांगां=पाय, तंगड्या. मृत माणसाचे पाय खाली वर कसेहि ठेवले तरी त्याला दुखापत होत नाही; किंवा विशोभित दिसत नाही. अेखाद्या गोष्टीचें महत्त्व निघून गेलें की मग तिचा अुपयोग करावा असा आशय. शुद्ध स्वरूप : मेलेल्याच्या तंगड्या खाली काय, वर काय !

२४. धोंदाचां सोंडेक, आणि सोडेंचां धोंदाक : ही म्हण अतिशय मार्मिक आहे. जो मनुष्य मातीची गणपतीची मूर्ति करतो त्याच्याजवळ जर माती कमी असली तर तो मूर्तीची सोंड लहान झाल्यास तिला दोंदाची माती लावतो, व पुन्हा दोंदाला कमी पडल्यास सोंडेची माती लावतो. गणपतीची सोंड अगर दोंद यांच्यामध्ये मातीची अदलाबदल करावी लागल्यामुळे, त्या कारागिराची ओढाताण होते. तशीच ओढाताण जो मनुष्य कमी अुत्पन्नामुळे, जमाखर्चाची तोंडमिळवणी करूं पाहतो त्याची होते. अेका खात्याचा खर्च कमी करून तो दुसरीकडे खर्च करतो, तों इकडे पुन्हा जरुरी भासतेच ! "दोंदाची सोंडेला व सोंडेची दोंदाला" अशा स्वरूपामध्ये ही म्हण सगळीकडे रूढ करणें योग्य होईल.

२५. आली आषाढी, सण हाकारी : भाद्रपद शु. अेकादशी ही आषाढी एकादशी म्हणून प्रसिद्ध आहे. म्हणीमध्ये "आषाढी अेकादशी" याअैवजीं 'आषाढी' हा शब्द शिल्लक राहिला आहे. 'आषाढी'अैवजीं 'आखाडी' असाहि शब्द रूढ झालेला आढळतो. आषाढी अेकादशी आली की त्या अेकादशीपासून दिवाळीपर्यंत सणांचा सुकाळ असतो. म्हणून ही अेकादशी सण हाकून आणते अशी म्हण पडली आहे. हाकारी=हाकते. म्हणीचें तेंच रूप मध्यमराठी भाषेस दूरचें वाटेल असें वाटत नाही. आली दिवाळी सण दिवाळी असें अेक पूरक वाक्य ह्या म्हणीला जोडून उच्चारलेलें आढळतें. त्याचा अर्थ, "दिवाळी आली की सण संपतात" असा आहे.

२६. सासूबायनूं, ससांक जांव काय शेळकुंडांक जांव ! सासूबायनूं=अहो सासूबाओ, (संबोधनाचें आदरार्थी बहुवचन), शेळकुंडांक=गोवऱ्यांना, गोवऱ्या शोधण्याला, ससांक= ससांना, ससे शोधण्यासाठी) जांव=जाऊं. अेक सूनबाओ अेकदा गोवऱ्या शोधून आणण्यासाठी माळावर गेली. तिथे तिला अेक ससा आढळला. हा ससा मेलेला होता. पारध्यांनी सशाला मारल्यानंतर तो पळून गेला, व मेलेल्या स्थितींत त्या सूनबाओला तो आढळला. तो तिने घरीं आणला व त्याचा आहारासाठी उपयोग केला. दुसऱ्या वेळीं ती सासूबाओकडे गोवऱ्या वेंचा- यला जाऊं कीं ससे शोधायला जाऊं असें विचारीत आहे. नेहमी मेलेले ससे माळावर सापडत नसल्यामुळे तिचा मूर्खपणा दिसून येतो. अविचाराने गोष्टी करणाराला, ही म्हण लाव- तात. शुद्ध स्वरूप, "सासूबाओ, सशांना जाऊं कीं गोवऱ्यांना जाअूं !"

२७. हार म्हटल्या भार, संसो म्हटल्या सांभार : ही म्हण अर्धवट अैकून विचित्र अर्थ करणाऱ्या माणसाला लावतात. 'हार' हा शब्द 'भार' अैकणाऱ्याला ही म्हण लागते. 'हार' आणि 'भार' निरर्थक पण प्रास जुळविणारे शब्द आहेत. सांगणाऱ्याने अैकणाराला 'संसो' असें सांगितलें त्याचा अुद्देश 'ससा' हा प्राणी असा होता. पण अैकणारा 'सांबर' असें समजला. 'सांबार' 'सांभार'='सांबर'. म्हणीचें सर्व महाराष्ट्रासाठी स्वरूप 'हार म्हटल्यावर भार व ससा म्हटल्यावर सांबर' असें होओील.

२८. सगळो दिवस तळी, खांवक गेल्या अळवाच्या नळी : 'डोंगर पोंखरून अुंदीर काढला' ह्या म्हणींच्या वरच्या म्हणच्या अर्थामध्ये साधर्म्य आहे. जो मनुष्य अनेक दिवस अगर पुष्कळ काळ श्रम करतो व शेवटीं क्षुद्र गोष्ट निष्पन्न करतो, त्याला अनुलक्षून ही म्हण आहे. तिचा उगम स्वयंपाकावरून झाला आहे. स्वयंपाकीण सर्व दिवसभर तळते पण शेवटीं पानावर बसलें की अळूच्या 'नळी' मिळतात. तळणें व 'नळी' तयार करणें ह्यांत असंबद्धता आहे. म्हणून ह्या म्हणीच्या योजनेने विनोदहि निर्माण होतो. अळूच्या पानाच्या देठाला नळी म्हणतात. पण तो शब्द अळूच्या सर्व पानालाहि चालतो. म्हणीचें मध्यमराठीमध्ये 'सगळा दिवस तळी, खावयास अळूच्या नळी' असें रूपान्तर होओील. यमकासाठी नळी हा शब्द कायम ठेवणें योग्य दिसतें.

२९. रांडोळेच्या पोराक, वडाय होयो कित्याक ! 'रंडागीतानि काव्यानि' या अुक्तीमध्ये जो शब्द आहे तोच येथे 'रांडोळी' ह्या स्वरूपामध्ये आहे. म्हणून तो ग्राम्य वाटला तरी ह्या म्हणींत ठेवावयास हरकत नाही. 'रांड' हा शब्द कुडाळप्रान्तांत विधवेला लावण्यांत येतो; तसाच तो राखेला म्हणजे ठेवलेल्या स्त्रीलाहि लावण्यांत येतो. पण त्या म्हणींत आर्थिक व सामाजिक हीन स्त्री अशा अर्थाचा द्योतक आहे. पोराक अगर पॉराक=पोराला. वडाय=वढाया (अ. व.). होयो=हव्या. कित्याक=कशाला. हीन दर्जाच्या स्त्रीला मुलाचा दर्जा हीन असा- वयाचा व तो तसाच राहावा ही अितरांची अिच्छा. म्हणून ही म्हण बढाअिखोर पण हीन दर्जाचा अशा मानलेल्या माणसाला अितरांकडून लावण्यांत येते, किंवा हीनगंड झालेला खालच्या दर्जाचा मनुष्य, वढाअि करीत नसल्यास, आपल्या वागणुकीच्या समर्थनार्थ तो ह्या म्हणीचा आधार देतो. 'पतितेच्या (अगर दलितेच्या) पोराला वढाया कशाला !' असें शिष्ट रूप वापरांत आणावें.

३०. बायल दॅवची पण वडाय दॅव नये : वढाअिखोर मनुष्य स्वतःचें समर्थन करण्यासाठी ही म्हण वापरतो. बायको द्यावी पण बढाअि देअूं नये असा त्याच्या बोलण्याचा आशय असतो.

बायकोपेक्षा वढाअीची किंमत जास्त केलेली असते. बायल=बायको. हिचें शिष्टसंमत स्वरूप असें होअील. 'बाअिल द्यावी पण वढाअि देऊं नये. 'बाअिल' हा शब्द 'बाअिल म्हणे खर मरता तरी बरें' ह्या तुकारामोक्तींत आढळतो, तो कायम ठेवणें अुचित होअिल.

३१. कणकांची आग आणि चेडवांची जाग : कणक=कांटेरी बांबू. चेडवांची=मुलींची. कणकांची आग टिकाअू नसते. त्याचप्रमाणे मुलींची जाग टिकाअू नसते. 'जाग' ह्या शब्दाचा अर्थ जागृति असा रूढ नसून 'सहवास' असा रूढ आहे. मुली मोठ्या झाल्या म्हणजे सासरीं जातात. व मग माहेरचा लोभ विसरतात. क्वचित्प्रसंगीं थोडे दिवस माहेरपणाशाठी येतात पण त्यांचा आसरा म्हातारपणीं आअीबापांना मिळत नाही. त्यांना मुलांवरच विसंबून राहावें लागतें. आर्थिक स्वातंत्र मिळाल्यावर ही स्थिति पालटेल पण तोंपर्यंत ही म्हण वस्तुस्थितीचें निदर्शक आहे. बालविवाह रूढ होता त्या वेळीं त्या म्हणीमध्ये आताच्यापेक्षा जास्त सत्य होतें. मुली व मुलगे ह्यांतला विरोध 'शेळकुडांची आग व झिलांची जाग' या म्हणीमध्ये दिसून येतो. शेळकुंडें म्हणजे गोवऱ्या. ह्यांची आग बराच काळ टिकते. आगपेट्यांचा संचार खेड्यांतील चुलींपर्यंत होण्यापूर्वी शेळकुडांची आग सर्व रात्रभर टिके व स्त्रियांचें अग्निहोत्र–व्यावहारिक अर्थानें, धार्मिक अर्थानें नव्हे–कायम राही. म्हणून ही म्हण पुढे लुप्त होणाचा संभव असला तरी बरीच मार्मिक आहे.

३२. बायल बगी मॉट, आवस बगी पॉट. बायल=बायको. बगी=बघे (रीतिवर्तमानकाळ). आवस=आअी. बगी=बघे (री. व.) पॉट=पोट. ही म्हण आअीची मुलाकडे पाहण्याची दृष्टि व बायकोची पतीकडे पाहण्याची दृष्टि यांमधील फरक दाखविते. परदेशांत अगर कामाला गेलेल्या व्यक्तीने किती जिनसा आणल्या हें बायको पाहते ती स्वार्थी दृष्टीने मॉट म्हणजे बोजा (बोचकें) पाहते, व आअी मुलाला भूक लागली आहे काय हें पाहते. आई प्रेमाने पाहते व बायको स्वार्थानें पाहते असा ह्या म्हणीचा अर्थ आहे. मध्यमराठी स्वरूप—बायको बघे मोट आअी बघे पोट.

३३. कोणायच्या कॉंब्यान् अुजवाडांदे : कोणायच्या=कोणाच्याहि. च्या ह्या प्रत्ययाच्या सामान्यरूपापूर्वी 'ही'चा अपभ्रंश 'य' हा लावला आहे. कॉंब्यान्=कोंबड्याने. अुजवाडांदे= अुआडूंदे. हितकर गोष्ट व्हायची असली तर तिचें श्रेय कोणालाहि मिळो पण हितकर गोष्ट घडो असा अभिप्राय ही म्हण व्यक्त करते. कोंबडा आरवल्यावर अुजाडतें. म्हणून 'आरवणें' व 'सूर्योदय' यांत कार्यकारणभाव कल्पून कोणाच्याहि हातून श्रेयःस्कर गोष्ट घडो असें म्हणतात. 'कोणाच्याहि कोंबड्याने अुजाडूंदे' असें रूप रूढ करणें योग्य होय.

३४. जगाची पीडा वाळक्याच्या माथ्यावर : ह्या म्हणीचा लाक्षणिक अर्थ 'भित्यापाठी ब्रह्मराक्षस' ह्या म्हणीच्या लाक्षणिक अर्थाशीं बहुतांशीं जुळणारा आहे. वाळक्या ह्याचा अर्थ ज्याला टेंगूळ आहे असा आहे. 'अवाळें' म्हणजे टेंगूळ हा शब्द रामदासी वाङ्मय माहीत असलेल्यांना परिचयाचा आहे. ह्याचा व 'वाळूक' याचा अर्थ अेकच. कपाळावर रक्त सांचून फुगलेल्या भागास 'वाळूक' म्हणतात, व तें ज्या माणसाच्या शरीरावर असेल त्याला 'वाळक्या' म्हणतात. कुडाळी रूप 'वाळको' असें आहे. वाळक्या माणसाला जग त्रास देतें असा वाच्यार्थ आहे. ज्या माणसाची परिस्थिति निकृष्ट असते त्याला सगळे लोक त्रास देतात असा अर्थ घ्यावयाचा. 'माथ्यावर' ह्याच्या अैवजीं 'माथ्यार' असेंहि रूप आढळतें. माथ्यार=डोक्यावर. ह्या म्हणीचें शिष्टांसाठी स्वरूप असें होईल—जगाची पीडा, वाळक्याच्या माथ्यावर. 'माथां' हें रूप जुन्या वाङ्मयांत रूढ असल्याने तें ठेवलें तरी चालेल.

३५. काय करशी द्यावा तर अडला तयार (पडला तयार) पाय ठेवीन : कोणीहि मनुष्य संकटांत सापडला की तिथे पैशाचिक देवता त्याच्या विरुद्ध जातात अशी समजूत ही म्हण व्यक्त करते. अडचणीच्या वेळीं पिशाच्चांना नवस करण्याची चाल आहे किंवा बळी देण्याचीहि चाल आहे. करशी=करशील. द्यावा=देवा. देव हा शब्द अंगांतील संचार, पिशाच्च यांना सुद्धा लावण्यांत येतो. हें संबोधनाचें अेकवचन. अडल्यार=अडलेल्यावर, संकटांत पडलेल्यावर. पडल्यार=पडलेल्यावर. म्हणीला 'काय करशील देवा, तर अडलेल्यावर पाय ठेवीन' असें रूप देतां येअील.

३६. वेताळाक नाय बायल, भावकादेविक नाय घोव : वेताळ हा अेक देव आहे. कित्येक देवळांतून तो नग्नावस्थेंत असतो, व सर्व देवळांतून नग्नावस्थेंतच कोरलेला असतो. भावकादेवी ही अेक देवी आहे. हीच भद्रकाली देवी. या दोघांपैकी पहिल्याला बायको नाही व दुसरीला नवरा नाही. म्हणून ज्या वेळीं मुलाला नवरी सांगून येत नसेल, व मुलीला नवरा सांपडत नसेल अशांचें लग्न झाल्यास ही म्हण लावतां येते. तसेंच अन्योक्तीने ज्या वेळीं न विकणारी वस्तु व ज्याला वस्तु मिळत नाही असे गिऱ्हाअीक यांची गांठ पडेल किंवा त्यांच्याशीं तुल्यबल अशा घटना घडतील त्या वेळीं या म्हणीचा अुपयोग करतात. घोव=नवरा. प्राकृत 'गोहो'वरून हा शब्द आल्यामुळे तो महाराष्ट्रीयांस त्याज्य वाटण्याचें कारण नाही. पण त्याच्या अैवजीं 'नवरा' हाच शब्द शिष्टांनी अुराशीं बाळगला आहे. 'वेताळाला नाही बायको, भावकादेवीला नाही नवरा' हें ह्या म्हणीचें मध्य मराठी रूपान्तर होअील.

३७. रानांत भय वाघाचो, गांवांत भय गांवकाराचो : सह्याद्रीच्या आसपास रानांतून वाघ असतात म्हणून तिथे वाघाचें भय असतें, तसेंच गांवामध्ये 'गांवकर' हा सत्ताधीश असतो, म्हणून गांवामध्ये त्याचा दरारा असतो. आता गांवकराचें महत्त्व मात्र कमी होत चाललें आहे. शुद्ध स्वरूप, 'रानांत भय वाघाचें, गांवांत भय गांवकराचें'.

३८. तंव तंव शेंडि माझि खाज करी : अेखाद्याला अुपदेश करीत असलों व तो मनावर घेत नसला तर त्याला अुद्देशून म्हणतात. तसेंच अेखाद्या प्राण्यासाठी आपण टपून बसलों असलों व तो आटोक्यांत येत असला की आपली जी अवस्था होते तिला अुद्देशूनहि म्हणतात. शेंडी खाज करणें=स्फुरण येणें. मध्य मराठी रूप, तों तों शेंडी खाज करी.

३९. वशाळ्या रानांत येरंड बळी : 'निरस्तपादये देशे अेरंडोऽपि द्रुमायते' या सुभाषिता-मध्ये व वरील म्हणीमध्ये पुष्कळ साम्य आहे. वशाळ्या=वाअीट, भुरट्या. शब्दशः अर्थ भुरटी झाडी असलेल्या रानांत अेरंड बलिष्ठ असतो. मध्य मराठी रूप—भुरट्या रानीं अेरंड बळी.

४०. जांवय पावणो अिलो म्हण रेडो दूध दॆंवचो नाय : जांवय=जामात. पावणो=पाहुणा. अिलो=आला. म्हण=म्हणून. रेडो=रेडा. दॆंवचो=द्यावयाचा. नाय=नाही. जावअी पाहुणा आला तरी रेडा दूध देत नसतो. जावअी आला म्हणजे त्याच्यासाठी ऋण काढूनहि पोळ्या करतात. पण रेडा दूध देणें ही अशक्य गोष्ट मात्र होत नाही. म्हणीचें मध्य मराठी स्वरूप, जावई पाहुणा आला म्हणून रेडा दूध देत नसतो.

४१. अुपासांनी देव मिळे तर दुष्काळांत मेले काय थोडे ! अुपासांनी म्हणजे अुपोषण करून देवप्राप्ति होते अशी भाविक लोकांची समजूत असते. पण ज्याला अुपोषण करावयाचें नसतें तो ही म्हण भाविक लोकांच्या तोंडावर टाकतो. दुष्काळांत लोक अुपासांनी मरतात.

पण त्यांना देव मिळत नसतो, म्हणून अुपोषण-व्रतांनी देव मिळत नाही असा आशय. शुद्ध स्वरूप तेंच कायम असावें.

४२. धुतलली माखलली धर्तरी आणि न्हालली धुतलली अस्तुरी : धुतलली=धुतलेली. माखलली=माखलेली, लिंपलेली. धर्तरी=धरित्री, पृथ्वी. न्हालली=आंघोळ केलेली. अस्तुरी=स्त्री. संमार्जन केलेली जमीन व स्नान केलेली स्त्री ह्या सुंदर दिसतात असा आशय. ही म्हण 'कृताभ्यंगस्नाना वनिते'ची आठवण करून देते. शुद्ध रूप—धुतलेली धर्तरी आणि न्हालेली अस्तरी. प्रासासाठी 'अस्तरी' शब्द योजणें योग्य.

४३. लावीन फडी, जायन वाडी : फडी=रांग. वाडी=ठिकाण. श्रीमंत व गर्विष्ठ अशा माणसाचें या म्हणीने वर्णन करतां येतें. अेक श्रीमंत मनुष्य मी रुपयांच्या रांगा लावून त्या रांगांवरून चालत 'वाडी' या ठिकाणापर्यंत जाअीन असें म्हणत असे. त्यावरून ही म्हण रूढ झाली आहे. 'लावीन फडी, जाअीन वाडी' असें शुद्ध रूप रूढ करतां येअील.

४४. तेल्याचो बैल मेलो, बाँब मार बामणा : तेल्याचो=तेल्याचा. मेलो=मेला. बाँब=बोंब. बामणा=ब्राह्मणा (संबोधन). तेल्याचा बैल मेला तर तेली बोंब मारील, पण ब्राह्मण बोंब मारणार नाही. पण असंबद्ध गोष्टीचें वर्णन करावयाचें असल्यास ही म्हण वापरतात. 'अकटश्च विकटो राजा कुंतीपुत्रश्च रावणः' ह्या म्हणीला जोडूनहि ही म्हण वापरतात. 'तेल्याचा बैल मेला, बोंब मार ब्राह्मणा' असें शुद्ध रूप होअील.

४५. गजालीन घोव खाल्लो : गजालीन=गोष्टीने, गप्पा मारण्याने. घोव=पति. खाल्लो=खाल्ला. 'घोव खाल्लो' याचा शब्दशः अर्थ 'नवरा खाल्ला' असा होअील. पण तो तसा घ्यावयाचा नसून कामास विलंब लागला असा घ्यावयाचा. गप्पा मारीत राहिल्याने जेव्हा कामाला खोळंबा होतो त्या वेळीं ह्या म्हणीचा अुच्चार होत असतो. शुद्ध स्वरूप, गोष्टींनी पति खाल्ला.

४६. शिजलालं माझ्या घोवाक वाढ, तुझ्या घोवाक भुकेचा अुपाय सांगतंय : दोन स्त्रियांपैकी अेकीने स्वयंपाक केलेला असतो, तेव्हा दुसरी तो स्वयंपाक आपल्या नवऱ्यास वाढावा व वाढणारीच्या नवऱ्यासाठी आपण भुकेचें औषध सांगतें असें म्हणते. ह्यांत दुसऱ्या स्त्रीची भाषा हातचलाखीची आहे. कित्येक वेळां ही भाषा पहिलीस कळते. कित्येक वेळां कळत नाही. अशा रीतीने 'ब' व्यक्ति 'अ' व्यक्तीच्या डोळ्यांत धूळ फेकूं लागली की 'अ' व्यक्ति आपण 'ब'ची युक्ति समजलों हें सांगण्यासाठी या म्हणीचा अुपयोग करते. शुद्ध स्वरूप, शिजलेलं माझ्या नवऱ्याला वाढ, तुझ्या नवऱ्याला भुकेचें औषध सांगतें.

४७. मी आणि माझो नारो, नको कोणाचो वारो : हल्लीच्या बायका स्वतःच्या नवऱ्याशिवाय अविभक्त कुटुंबांतील अितरांनी कदर करीत नाहीत; अविभक्त कुटुंब सोडून राहण्याची त्यांची प्रवृत्ति असते. अशा बायकांना अुद्देशून ही म्हण आहे. ठराविक माणसांशिवाय अितरांविषयी फिकीर न करणाऱ्या माणसालाहि लावतात. नारो=नारायण. वारो=वारा. म्हणीचें शुद्ध स्वरूप, मी आणि माझा नाऱ्या (रा), नको कोणाचा वारा.

४८. मोजलाल्या माप्या, काय खाशी पाप्या : मापया=मापाने (हा शब्द विभक्तीने बरोबरसा सुटत नाही). पापया=पाप्या! (संबोधन). हे पापी माणसा, तूं मोजलेल्या मापामध्ये काय खाशील ! असा शाब्दिक अर्थ आहे. ज्या कुटुंबांत धान्य मोजून तें आटोकाट किंवा मोठ्या कुंजुषपणाने वापरावयाचें असतें त्या कुटुंबांतील माणसांस पोट भरेपर्यंत खायला मिळणार नाही. श्रीमंतांना याची कल्पना यावयाची नाही. पण गरिबांना मोजकें

अन्न दर दिवशीं शिजवून भागणार नाही, कारण समृद्धीमुळे वाटणारी जी तृप्ति ती त्यांत नसते. म्हणून मोजक्या मापाने शिजविल्यास पोटभर खायची पंचाअीत होते असें ही म्हण दर्शविते. शिष्टसंमत स्वरूप, मोजलेल्या मापाशीं, काय पाप्या खाशी !

४९. गीताबिता बरो वाचता, पण गुण काय ते वशाड : गीता=भगवद्गीता. बिता= त्याला अर्थ नाही. वरो=चांगला. वाचता=वाचतो. वशाड=वाअीट. अेखादा माणूस गीता चांगली वाचतो, पण त्याचे गुण चांगले नसतात. वरून धार्मिकपणा दाखवून दुराचरण करणाऱ्या ढोंग्यांस ही म्हण लागते. शिष्टसंमत स्वरूप, गीता वाचतो बरी, पण गुण वाअीट करी.

५०. लिनां आणि भिकारच्चिनां : ज्या लोकांना लेखन कलेची टर उडवायची असते त्यांच्या तोंडीं ही म्हण असते. ही म्हण लोक गंभीरपणाने वापरीत नाहीत. लिहिणें हें भिक्षेकऱ्याचें चिन्ह आहे असें ही म्हण दाखविते. 'दीक्षा संभाळणाऱ्यां'ना 'भिक्षा' मागण्याची जरुरी असते हा पूर्वीचा दण्डक या म्हणीमध्ये परिवर्तित झाला नसावा. पण हल्ली व पुढे मात्र ही म्हण सुशिक्षित बेकाराला गंभीर अर्थाने वापरावी लागेल. शिष्टसंमत स्वरूप, लिहिणं आणि भिकाऱ्याचं चिन्ह.

५१. आपल्या अळवाची खाज आपणाक ठावक : 'अळू' ही भाजी शिजवितांना पुरेशी चिंच न पडल्यास घशास बसते व कंडू अुत्पन्न करते. धन्याला ही गोष्ट माहीत असते, म्हणून आपली मुलें अगर आपल्या परिचयाचीं माणसें किती दुष्ट असतात हें दाखविण्यासाठी ह्या म्हणीचा अुपयोग करतात. हट्टी मुलाला समजविण्याचा प्रयत्न कोणी करूं लागल्यास मुलाचे नातलग ह्या म्हणीचा उपयोग करितात. तसेंच 'अ'ने 'ब'ला फसविलें व नंतर 'अ'ने 'क'ला फसविलें व 'क' ती गोष्ट 'ब'ला सांगूं लागला तर 'अ' आणि 'ब'चा विशेष परिचय असल्यास 'ब' ही म्हण वापरतो. शिष्टसंमत स्वरूप, आपल्या अळूची खाज आपणांस माहीत.

५२. धरलां तर चावता, सोडलां तर पळता : ही म्हण वरून कोड्यासारखी आहे. पण तिचा गर्भितार्थ अेक पेचप्रसंग चित्रित करते. ही म्हण खेकड्याला अुद्देशून आहे. नवशिक्या पकडणाऱ्याची म्हणींत वर्णिल्याप्रमाणे स्थिति होते. अेखाद्या वेळीं तो खेकडा पकडतो, पण त्याचे आंकडे युक्तीने न पकडल्यास खेकडा आपल्या पुढच्या दोन्ही आंकड्यांनी, धरणाऱ्याचें बोट अगर कातडीचा भाग पकडतो. धरणाराला वेदना होअूं लागतात. त्याने हातांत ठेवला तर खेंकडा चावतो, व वेदना सहन कराव्या लागतात, व सोडला तर तो पळून निराश व्हावें लागतें. ह्या म्हणीमध्ये 'अिकडे आड व तिकडे विहीर' यांतील अर्थ आहेच, पण त्याहूनहि जास्त मार्मिकपणा ह्या म्हणीमध्ये आहे. शिष्टांसाठी रूपान्तर, धरला तर चावतो, सोडला तर पळतो.

५३. सत्याक नाय गत, कुळाव्याक नाय नांदणुक : सत्ताक=सत्याला. गत=गति, अुत्कर्ष. कुळाव्याक=लग्न जुळविणाराला. नांदणूक=वंशविस्तार, अेका ठिकाणीं चिरकाल वसाहत. जो लग्न जुळवितो त्याला शेवटीं शिव्या मिळतात, कारण गरीब कुटुंबामध्ये व श्रीमंतांमध्ये सुद्धा भपक्यावर लग्नें ठरवितात व मागाहून अेकमेकांचीं अंतरंगें कळतात. म्हणून जुळविणाऱ्या मध्यस्थाला शिव्या खाव्या लागतात. तसेंच सत्याने वागणाराचा अुत्कर्ष होत नसतो. ह्या म्हणीमध्ये त्रिकालाबाधित सत्य नाही, पण ही म्हण ज्या वेळीं मध्यस्थाला शिव्या

अनुक्रमणिका

मिळतात त्या वेळीं, व सदाचरणाने वागूनहि ज्याचा अुत्कर्ष होत नाही अशी परिस्थिति आढळते त्या वेळीं वापरतात. शिष्टसंमत स्वरूप, सत्याला गति नाही, मध्यस्थाला नांदणूक नाही.

५४. खाय गाडो, सुको नाडो : खाय=खातो–ते–तें. गाडो=गाडा ( गाडाभर अन्न ). सुको=शुष्क. नाडो=खांब. गाडाभर अन्न खाअूनहि काठीप्रमाणे बारीक असणाऱ्या मुलांस ही म्हण लावतात. निगा ( nurture ) किती निरुपयोगी असते व त्याच्यावर निसर्गाचा म्हणजे आनुवंशिक अगर रोगटपणाचा कसा परिणाम होतो हें ही म्हण दाखविते.

५५. वऱ्याची माती वऱ्याक : 'वरो' हा शेतकींतील शब्द आहे. नांगरटीची नांगराने केलेली मर्यादित जागा असा तिचा अर्थ आहे. कितीहि नांगरलें तरी त्या वऱ्याच्या म्हणजे मर्यादेच्या बाहेर माती जात नसते. ज्याचें अुत्पन्न जेमतेम खर्च भागण्याअेवढें असतें त्याला अुद्देशून ही म्हण लावतात. शिष्टसंमत स्वरूप, वऱ्याची माती वऱ्याला. यांतील 'वरा'मुळे 'वरो' हा प्रादेशिक व धंदेवाअीक शब्द असल्यामुळे त्याचा अर्थ दुसऱ्या अनेक शब्दांनीहि व्यक्त होणार नाही. म्हणून तो शब्द म्हणीबरोबर नागर बनविणें योग्य होअील.

५६. गायचो पाडो खंय तरि वाडो : गायचो=गाअीचा. पाडो=पाडा. खंयतरि=कुठे तरी. वाडो=वाढो. आपला हितसंबंधी व ऋणी असा मनुष्य कुठे तरी सुखाने राहो अशी अिच्छा ही म्हण प्रदर्शित करते. ही म्हण सामान्य विधान करणारी नसून फक्त आशीर्वादात्मक आहे. मध्यमराठी स्वरूप, गाअीचा पाडा कुठे तरी वाढो.

५७. धुयेआधी लेवचां, झिलाआधी खांवचां : धुयेआधी=मुलीच्या पूर्वी. लेवचां=ल्यावें, वापरावें. झिलाआधी=मुलाच्यापूर्वी. खांवचां=खावें. गरिबाच्या घरचा मुलगा आअीला सर्व वस्तु खाअूं देत नसतो. कारण तो तिचा वांटा मागतो. तसेंच आअीचे अलंकार मुलगी वापरावयास मागते. म्हणून 'मुलीच्यापूर्वी ल्यावें व मुलापूर्वी खावें' अशी म्हण पडली.

५८. सून नाय ती सासू बरी; सासू नाय ती सून बरी : सासवांसुनांचीं पूर्वकाळींचीं भांडणें संत सखूबाअीसारख्या नाटकांतून प्रसिद्ध आहेत. फक्त अेकटीच सासू अगर अेकटीच सून असल्यास ती चांगली ठरते व भांडणें होत नाहीत असा आशय. 'सून नाही ती सासू बरी व सासू नाही ती सून बरी' हें मध्यमराठी रूपांतर होअील.

५९. कावळ्याकडे दिलो कारभार, त्याणां घाणीन भरलो दरबार : शुद्ध स्वरूप, कावळ्याकडे दिला कारभार, त्याने घाणीने भरला दरबार. कावळा घाणेरडा असल्यामुळे त्याच्याकडे सत्ता दिल्यास तो घाण करतो. नालायक माणसाच्या हातच्या सत्तेचा दुरुपयोग होतो हा आशय.

६०. फॉव नाय कातळी, सुको जागर : पोह्यांबरोबर खोबरें खाण्याची चाल आहे. कोणतेंहि काम हातीं घेतलें व त्यापासून फायदा नसला तर ही म्हण लावतात. शुद्ध स्वरूप, पोहे नाही कातळी नाही, सुका जागर. मराठी शब्दसंपत्तींत भर टाकण्यासाठी 'कातळी' शब्द रूढ व्हावा हें युक्त आहे.

६१. घराक नसली घरती, मगे व्यांगां झाली वरती : घराला योग्य शिस्त नसली की त्याचा अपकर्ष होतो असा आशय आहे. शुद्ध स्वरूप, घराला नसली घरती, मग पाय होतात वरती. 'घरती' हा प्रादेशिक शब्द आहे. प्रासासाठी तो कायम ठेवावा.

६२. मोन्याची खुणा मोनो जाणा : मुक्याची खुणा मुक्याला कळते, असा आशय. शुद्ध स्वरूप, मुक्याची खूण मुका जाणे. 'मोन्याची खुणा, राम जाणा' असेंहि म्हणतात.

६३. होती रग, घेतली घग : धग=पातेरा पेटवून तयार केलेली अुष्णता. सुकीं पानें जाळून थंडीमध्ये ही अुष्णता घेतात. तारुण्य, लक्ष्मी, सत्ता वगैरेनी जो अुन्माद येतो, व त्या अुन्मादाच्या भरामध्ये जें मर्यादातिक्रमण होतें त्याला ही म्हण लावतात. 'होती रग, घेतली घग' हें शुद्ध स्वरूप होय.

६४. सुकळ नकळा दुकळ माझो शेवरो पालेले : शेवरी ही रानटी वनस्पति, मृगाच्या-पूर्वी पाअूस येण्यापूर्वीच पालवते. तिला पाणी असलें नसलें ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच महत्त्वाच्या. म्हणून जो सभोवताली बरी किंवा वाअीट परिस्थिति असतां त्याप्रमाणे वर्तनांत फरक न करतां आपल्या चैनी कायम ठेवतो व आपलें सौख्य शोधतो त्याला ही म्हण लावतात. सुकळ=सुकाळ. दुकळ=दुष्काळ. पालेलो=पल्लवित झाला. म्हणीचें मध्यमराठीमधील रूपांतर, सुकाळ न कळे दुष्काळ, माझा शेवरा पालवला. "पालवणें" हें क्रियापदरूप व्हावें.

६५. नको गे बाये कोकणांतले घोव, सावलां सोडून घेव पण निरोप देव : कोकणांत अुपजीविकेसाठी फार परिश्रम पडतात. ते परिश्रम सहन न होअून अेक कोंकणाबाहेरची बायको आपलें वस्त्र सोडून घ्यावें पण निरोप द्यावा म्हणजे घटस्फोट करावा असें म्हणत आहे. शुद्ध स्वरूप, नको ग बाई कोकणांतला नवरा, साडी सोडून घेवो पण निरोप देवो. लग्नांत वरपक्षाकडून साड्या मिळतात त्यांचा अुल्लेख या म्हणींत असावा. किंवा स्त्रीला अन्नवस्त्राचा हक्क असतो त्याचाहि कदाचित् असेल.

६६. आय बाय नागवली पांचवी जागवली : मुलाच्या जन्माचा पांचवा दिवस जागर करायचा असतो. त्या दिवशीं बाजंत्री वगैरेस खर्च येतो. ऋण काढून पांचवी जागवली असा आशय आहे. ऋण काढून सण केला की तिरस्काराने ही म्हण अुच्चारतात.

६७. नखटां तोडून काय मडां हलक्यां जाता : 'नखटां' हा अेका अश्लील शब्दाअैवजी योजला आहे. नखें तोडून मढें हलकें होत नाही हें रूपान्तर. ही म्हण समजण्यास सोपी आहे. हजार रुपये खर्च करतांना फक्त अेकदोन पशी कमी करणारास ही म्हण लावतां येते.

६८. म्हारीण बसली सकली, दोनय खळीं चुकली : भातें पिकण्याच्या मोसमांत महारणी आवणासाठी थोडें भात मागायला येतात. दोन्ही खळीं चुकूं नयेत म्हणून ती मधें बसली व फसली. हें 'दोन्ही डगरींवर" पाय ठेवणाराचें वर्णन आहे. 'दोन्ही घरचा पाहुणा अुपाशी' असा आशय 'महारीण बसली सखलीं दोन्ही खळीं चुकली'. सखल ह्या विशेषणाचा नामासारखा अुपयोग केला आहे.

६९. सीता, मंदोदरी, तारा, तेतुर माझा साळ्यां सारां : आपल्या मुलांचें मोठेपण अवास्तव रीतीने वर्णन करणारास किंवा स्वतःची थोरवी सांगणारास हा टोमणा आहे. पंचपतिव्रतांच्या योग्यतेचीं आपली 'साळू' आहे, असें अेक आअी सांगत आहे. शुद्ध स्वरूप, सीता, मंदोदरी, तारा, त्यांत माझी साळू सारा.

७०. अुसलांत पडललो वाड सोदी : अुशील=अुसांचें शेत. पडललो=पडलेला, गेलेला (गृहस्थ). वाड=गाळ्या असलेला व पुन्हा लावण्याच्या योग्यतेचा अुसाचा शेवटचा तुकडा. सोदी=शोधतो. अुसांच्या शेतांत गेल्यावर कुठलें 'वाड' घ्यावें याबद्दल शोधणारा फिकिरींत पडतो, कारण निवड करण्यासाठी पुष्कळ क्षेत्र असतें. म्हणून तो अुत्तमोत्तम वाड मिळावें असें अिच्छितो. फाजील चिकित्सा करणाऱ्या गिऱ्हाअीकाला ही म्हण लावतात. शुद्ध स्वरूप, अुसांत गेलेला वाड शोधतो. प्रादेशिक 'वाड' शब्द कायम ठेवावा.

चर्चा

# पुरोगामी वाङ्मय : दोन टिपणें

## १

## "कलेचा सामाजिक पाया व कलावंताचें व्यक्तित्व"

(१) "मानवी समाजाचा अितिहास हा वर्गकलहाचा अितिहास होय."

(२) वर्गकलहाचें स्वरूप समाजाच्या आर्थिक घटनेवर अवलंबून असतें.

(३) व्यक्तीचा जीवनकलह हा वर्गकलहाचाच अेक भाग आहे.

(४) कला ही व्यक्तीच्या जीवनकलहाचा अेक परिणाम आहे. ती अेक प्रतिकारात्म व प्रतीकात्मक कृति आहे.

(५) कलावंताचें व्यक्तित्व हें सर्वस्वी समाजाचा आर्थिक पाया, त्यामुळे अुत्पन्न झालेला वर्गकलह, वर्गकलहाची तीव्रता नष्ट होण्यासाठी समाजावर सक्तीने लादली गेलेली विचारप्रणाली आणि ह्या रूढ विचारप्रणालीशीं घडून येणारा व्यक्तिजीवनाचा संघर्ष ह्यांवरच अवलंबून असतें.

(६) कलावंताचें व्यक्तित्व ज्या सामाजिक संघर्षामुळे आकारास येतें तोच कलेचा सामाजिक पाया होय.

(७) संघर्षाच्या मुळाशीं असलेल्या प्रखर कलहात्मक सत्याशीं सदासर्वकाळ तादात्म्य ठेवण्यासाठीं लागणारा कणखरपणा ज्या कलावंतांत नसतो ते संघर्षापासून दूर पळतात व काल्पनिक विश्वांत विलीन होतात. विस्मृतिवाङ्मयाचा (Escape literature) अुगम हा असा आहे. कलहात्मक सामाजिक सत्यापासून दूर राहण्याची आवश्यकता हा विस्मृति-वाङ्मयाचा सामाजिक पाया होय.

(८) सामाजिक संघर्षाच्या मुळाशीं असलेल्या प्रखर कलहात्मक सत्याशीं समरस होअून जें वाङ्मय निर्माण होतें तेंच प्रगतिपर अथवा पुरोगामी वाङ्मय होय. कलहात्मक सामाजिक सत्याचा वैयक्तिक जाणिवेला सामाजिक अधिष्ठान प्राप्त करून देण्याची आवश्यकता हा पुरोगामी वाङ्मयाचा सामाजिक पाया होय.

(९) कलात्मक सामाजिक सत्याची जाणीव सदासर्वकाळ जिवंत ठेवणें ही गोष्ट कलावंतालाच नव्हे तर अनेक व्यक्तींना अशक्य असते. जाणीव जिवंत ठेवणाऱ्यांना हालअपेष्टा सोसाव्या लागतात. संघर्षाच्या वेदीवर बलिदान करण्याचेहि प्रसंग येतात. ह्या भीषण प्रकारामुळे 'विस्मृती'ला अेक प्रकारच्या सामाजिक गरजेचें स्वरूप कांही काळ प्राप्त होतें. विस्मृति-वाङ्मयाची वाढ म्हणजे सामाजिक क्रांतीपूर्वीची काळोखी पहाट होय.

(१०) परंतु कालांतराने रूढ जीवनाच्या विरोधाला सामाजिक स्वरूप प्राप्त होतें. सामुदायिक चळवळी अस्तित्वांत येतात. सामुदायिक पाठिंब्यामुळे कलहात्मक सामाजिक सत्याची जाणीव अधिक धिटाअीने व्यक्त होअूं लागते. पुरोगामी कलावंतांच्या वैयक्तिक प्रचीतीला सामाजिक प्रचाराचें स्वरूप प्राप्त होतें. रूढ समाजजीवनाचा विरोध कलात्मक वाङ्मयांतून अुघडपणें होअूं लागतो. पुरोगामी वाङ्मयाची वाढ म्हणजेच समाजक्रांतीपूर्वीची प्रकाशमय प्रभात होय.

अनुक्रमणिका

(११) संघर्षजन्य, वैयक्तिक, पुरोगामी विचारांच्या सीमा सामाजिक प्रचारांत, कलहाच्या तीव्रतेमुळे लुप्त होतांच, सामाजिक क्रांतीला सुरुवात होते. नवी समाजक्रांति प्रस्थापित होओपर्यंत सामाजिक गरजेमुळे प्रचारात्मक वाङ्मयाला प्राधान्य मिळतें. वैयक्तिक कलेचा सामाजिक पाया नष्ट होऊन प्रचारात्मक वाङ्मय वाढीस लागतें. प्रचारात्मक वाङ्मयाची वाढ म्हणजे वर्गकलहाच्या तीव्रतेचा, रूढ जीवनाच्या सामाजिक विरोधाचा, जुनी समाजरचना उलथून पाडून नवी समाजरचना अस्तित्वांत आणण्याचा, नव्या सामाजिक क्रांतीचा काल होय.

(१२) क्रांतीनंतर नवें समाजजीवन रूढ होतांच, पुन्हा अधिक विकसित व्यक्तिजीवन व रूढ समाजजीवन ह्यांच्यांत संघर्ष सुरू होतो. कलेला नव्या सामाजिक पायाचें अधिष्ठान मिळतें. नवी कला उदयास येते.

—पु. य. देशपांडे.

२

पुरोगामी, याहून निराळे ते अनुगामी.

मग प्रतिगामी कोण ?

पुरोगामीचा ध्रुवबिंदु म्हणजे सकल सृष्टीचें सुंदर विकसन.

पुरोगमन. गमन कोठे ? प्रवासाचें अंतिम ठरलें पाहिजे म्हणजे गमनाची दिशा ठरते.

अर्थात् सकल सृष्टीचें सुंदर व सुखदायक विकसन कोणतें तें निश्चित केलें पाहिजे. या निश्चितीचें साधन कोणतें ? बुद्धि हें अेक; दुसरें भावना. भावना व बुद्धि यांच्या संगमनाने जें दिसेल, कळेल व ठरेल तें अंतिम. यालाच आत्म्याचा साक्षात्कार म्हणतां येअील. हा साक्षात्कार भावनेला पटला पाहिजे, बुद्धीवर घासून कसाला अुतरला पाहिजे. मूळ आपली खूण आपल्याला पटून आपलें मन व बुद्धि यांचा पूर्ण संवाद आपल्या ठायीं झाला पाहिजे. मन व बुद्धि ज्यांची जितकी अकुंठित तितकी त्यांची निश्चयशक्ति अकुंठित; तितकें त्यांचें प्रगमन अधिक म्हणजे पुढे सवब तेंच पुरोगमन.

जवळचें मन व बुद्धि यांची ग्वाही अेक परंतु दुर्बळपणामुळे ती ग्वाही सोडून जे दुसऱ्यांच्या ग्वाहीची कास धरून वाट चालतात ते खोटे अनुगामी; मन बुद्धि यांची ग्वाही ही दुसऱ्यांच्या अधिक प्रभावी मनोबुद्धीच्या आधीन ठेवून जे चालतात ते सच्चे, खरे पराक्रमी अनुगामी.

खोटे अनुगामी हेच प्रतिगामी म्हणतां येतील; तसेंच मनबुद्धीची ग्वाही न विचारणारे प्रवाहपतित हेहि प्रतिगामी म्हणतां येतील.

दिशा, निश्चय अुलट किंवा निराळा झाला म्हणून कोणी प्रतिगामी ठरणें न्याय्य नाही. या निर्णयाला अशास्त्रीय म्हणावें. जो बुद्धीची कसोटी तयार व अुघडी ठेवतो व जो मनाचीं कपाटें उघडीं ठेवतो तो त्याचा निश्चय दुसऱ्या अशा व्यक्तीहून कितीहि निराळा असला तरी प्रतिगामी म्हणतां येणार नाही.

अखेर सर्वांच्या मनोबुद्धीचा अेकमेव निश्चय होऊं शकेल काय याचें उत्तर अज्ञात आहे. म्हणून पक्ष आहेत; मतभेद आहेत; वाद आहेत; युद्धें आहेत; हिंसा आहे.

खरा पुरोगामी मतावरून ठरणार नाही. तर मतनिश्चयपद्धतीवरून ठरेल.

पुरोगामी शब्दप्रमाण असूं शकत नाही, आत्मप्रमाणच असूं शकतो.

वेदमनुव्यासादिकांचे किंवा मार्क्सलेनिनादिकांचे शब्द प्रमाण मानणारा खरा पुरोगामी नव्हे.

शक्यतोंवर सर्व परानुभवांचा व परनिश्चितींचा स्वानुभव स्वनिश्चितींत परिपाक केला पाहिजे. तसें करून त्यांतील परकेपणा वाफवून काढून टाकला पाहिजे. बाकी शुद्ध स्वनिश्चयाचें सुवर्ण राहील. तेंच विचारब्रह्म, तेंच तत्त्वनिश्चय, तेंच गमनाचें अंतिम. तिकडे जाणें हें पुरोगमन. तदर्थ जो सारस्वताचा वा साहित्याचा आविष्कार तें पुरोगामी साहित्य. पुरोगामी साहित्याची ही कसोटी होय. [मंत्रद्रष्टे ऋषि हे सर्व पुरोगामी; शंकराचार्यमन्वादि सारे सच्चे अनुगामी; ज्ञानोबातुकोबासमर्थ हेहि सच्चे अनुगामी.]

ही तात्त्विक भूमिका. व्यवहारांत-आचारांत हिचा अुतारा संपूर्णतया आणण्यांत पूर्ण यश येत नाही. कारण परिस्थितीचा बाघ. या बाधाचें निराकरण हा यत्नयोग किंवा पुरुषार्थ. आणि हीच मानव्याची थोरवी. कित्येकांना जीवनभर या यत्नोपासनेचें सातत्य साधतां येअील. कित्येकांना साधतां येणार नाही. आत्यंतिक प्रयत्नाच्या दुर्बलतेमुळे त्यांचें हें असें होतें. आत्यंतिक प्रयत्नाची स्वच्छता, स्पष्टता निराळी; जोम, बल, निराळें. व्यवहारांत वळणें घ्यावीं लागतात; मनुष्य—प्रत्ययी मनुष्यहि—अडखळतो, ठेंचाळतो, भरंगळतो. त्यास पुन्हा ठिकाणावर येण्यास साह्य केलें पाहिजे.

या सृष्टिकृत सिद्धासिद्ध बांधाशीं झगडा करतांना माहीत आहे तेथवरच्या अितिहासावरून पाहतां मनुष्याचें यश मर्यादित आहे. मरणाची भिंत कोणी फोडून पुढे गेलेला पाहण्यांत नाही. तोवर सावध राहावें, मर्यादा ओळखून चालावें, हें अितिहास शिकवितो. ती शिकवण विसरूं नये.

क्रांति म्हणजे या बांधाशीं निकराची झुंज. पण झुंजीचें कार्य केव्हा तरी संपतें, अधिक यशाची आशा आटून जाते. मग शांतियुगाला प्रारंभ होतो. दोन्ही अवस्थांत,—क्रांतींत व शांतींत—पुरोगामी हा बाह्य साधनें बदललीं तरी पुरोगामीच राहतो. पुरोगामी पिंड खचला की खोट्या अनुगाम्यांना फावतें. सुखसाधन व विकसन थांबतें. म्हणजेच पुरोगमन थांबतें.

आदि—अंत माहीत नाही—पूर्णपणें ज्ञान होणें शक्य नाही. मध्य तेवढा कांहीसा ज्ञात. 'व्यक्तमध्य' प्रपंच तो हाच. यांतच गमन—हालचाल चालू असते. आणि येथेच गमनाचें पुरस्सरत्व सापेक्षतया आपण बोलूं शकतों. गमन शाश्वत—मग सूक्ष्म असो, स्थूल असो. पुरस्सरत्व कल्पनेचें.

गमन नव्हे तें मरण; निद्रा हें मरण नव्हे—आजार हेंहि मरण नव्हे. योग्य निद्रा व संशयित आजार (आमयत्व) हें गमन नसलें तरी मरण नव्हे. 'युक्ताहारविहार' हेंच अेक साध्य व सेव्य ठरतें. युक्तत्वाचें स्वरूप पारखावें अेवढें आपलें काम.

—द. वा. पोतदार.

---

# मराठी लघुलेखन

मराठी भाषेचें महत्त्व पटावयास लागल्यापासून विश्वविद्यालयांतसुद्धा मराठीला प्राधान्य प्राप्त झालें आहे, आणि भाषावार प्रांतरचना जर झाली तर विश्वविद्यालयीन शिक्षण मातृभाषेंतूनच दिलें जाअील; आणि जें महत्त्व पूर्वी अिंग्रजी भाषेला होतें तेंच महत्त्व मराठी भाषेस आल्यावांचून राहणार नाही. सध्याचा काळ प्रांतिक स्वायत्ततेचा असल्यामुळे ही गोष्ट विशेष अवघड आहे असें नाही. अेकीकडे राजकीय, व्यापारविषयक व सार्वजनिक व्यवहारांत

आणि त्याप्रमाणेच कोर्ट दरबारांत व कायदेमंडळांत सगळीं कामें त्या त्या प्रांतांच्या भाषेंतूनच चालावींत अशाविषयी मागणी होत आहे, तर दुसरीकडे प्रांतांना निरनिराळीं भाषावार विश्वविद्यालयें असावींत अशाविषयी खटपट करण्यांत येत आहे. महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें तर महाराष्ट्र विश्वविद्यालयासंबंधाने बरीचशी खटपट चालू आहे. आणि त्यामुळे महाराष्ट्र-प्रांताला महत्त्व यावयाचें असेल तर साहजिकच महाराष्ट्रप्रांताची भाषा जी मराठी तिला महत्त्व येणें क्रमप्राप्तच आहे.

परंतु मराठी भाषेला जर महत्त्व प्राप्त व्हावयाचें असेल तर ती भाषा जितकी समृद्ध व पूर्णावस्थेस जाअील तितकें हितावह होणार आहे. मराठी भाषेंत चांगले चांगले ग्रंथ निर्माण झाले पाहिजेत; आणि अशा प्रकारची ग्रंथसंपत्ति जर झपाट्याने निर्माण व्हावयास पाहिजे असेल तर मराठींत (द्रुत) लघुलेखनपद्धति अस्तित्वांत येणें जरूर आहे. अिंग्रजी भाषेंत लघु-लेखनपद्धति असल्यामुळे अेकंदर व्यवहार कसा झपाट्याने होअू शकतो व त्याचा फायदा वाङ्मयसेवकांना कसा होतो हें मशहूरच आहे. त्याप्रमाणेच मराठींतहि शास्त्रशुद्ध पायावर अुभारलेली लघुलेखनपद्धति निर्माण झाली पाहिजे. लघुलेखनपद्धतीपासून पुष्कळ फायदे आहेत. परंतु ज्या तऱ्हेची संपूर्ण व स्वतंत्र लघुलेखनपद्धति अिंग्रजींत आहे त्याप्रमाणेच मराठींत आजपर्यंत नसल्यामुळे लोकांची अशी अेक सर्वसाधारण समजूत झालेली दिसते की तशा प्रकारची लघुलेखनपद्धति अस्तित्वांतच नाही. दोन चार लोकांनी या बाबतींत प्रयत्नहि केले; परंतु ते जितके यशस्वी व्हावयास पाहिजे तितके झालेले नाहीत असें दिसतें. सध्या अेखाद्या मराठी व्याख्यानाचा अहवाल शब्दशः घ्यावयाचा म्हटला तर त्याला सर्वमान्य अशी लघुलेखनपद्धति अुपलब्ध नाही व त्यामुळे वर्तमानपत्रांचे वार्ताहर अशा प्रकारच्या व्याख्यानांचे अहवाल जे घेतात ते तो अहवाल लोटकपणाने, स्वतःच्या मगदूराने, कांही शब्दांचीं संक्षिप्त रूपें करून त्याच्या साहाय्याने घेतात. परंतु 'पिटमन' लघुलेखनाप्रमाणे सर्व-मान्य अशी लघुलेखनपद्धति जर मराठींत अस्तित्वांत आली तर तीपासून मराठी भाषाभि-वृद्धीस बरेंच मोठें साहाय्य मिळणार आहे.

दुसरी गोष्ट अशी की विद्वान लोकांचें लक्ष या गोष्टीकडे जितकें जावयास पाहिजे तितकें अजून गेलेलें दिसत नाहीं. मराठींत जी लघुलेखनपद्धति आणावयाची ती व्याकरणाच्या पायावर शास्त्रशुद्ध रीतीने अुभारलेली असून ती संपूर्ण पाहिजे. म्हणजे कोणत्याहि तऱ्हेचें कस-लेंहि लिखाण असलें तरी तें लघुलेखनपद्धतीने घेतां आलें पाहिजे. अशा प्रकारची एक पद्धति आमचे मित्र रा. रा. गणेश गंगाधर मराठे, अेल्. सी. अी. (३१३ ब, सदाशिव पेठ, पुणें २) यांनी पांच सहा वर्षांच्या अविश्रांत श्रमाने बसविली आहे. ती पडताळून पाहण्याचा सुयोग मला लाभला आहे. अितकेंच नव्हे तर हा लेखहि त्यांच्या शिष्यास मीं जें तोंडीं सांगितलें तें त्याने लघुलेखनपद्धतीने अुतरून घेतल्याचेंच फळ आहे. तेव्हा त्यांची पद्धति शास्त्रशुद्ध व संपूर्ण आहे यांत मुळींच शंका नाही. ज्याप्रमाणे इंग्रजी लघुलेखनपद्धतींत निष्णात असे बरेचसे लोक सांपडतील त्याप्रमाणेच या मराठी लघुलेखनपद्धतीचा दिवसेंदिवस जास्त फैलाव होणें जरूर आहे आणि म्हणून या लेखान्वयें मराठी भाषेसंबंधी अभिमान, आस्था व कळकळ बाळगणाऱ्या लोकांस, तसेंच मराठी भाषाभिवृद्धीसाठी झटणाऱ्या वाङ्मयोपासकांस अशी आग्रहाची विनंती आहे की त्यांनी मराठी लघुलेखनपद्धतीकडे आपलें लक्ष वळवावें आणि अशा प्रकारची पद्धति पडताळून पाहून मराठी भाषेंत आणण्याची खटपट करावी. जों जों मराठी भाषेस जास्त महत्त्व येअील तों तों लघुलेखक जास्त प्रमाणांत निर्माण होणें अवश्यक

आहे. या गोष्टीची तयारी आजपासूनच झाली पाहिजे, नाहीतर 'तहान लागल्यावर विहीर खणण्या'ची पाळी यावयाची.

असेंहि म्हणावेंसें वाटतें की लहान मुलांना आपण जी लिपी शिकवतों ती शिकवतांना शक्य असेल तेथे लघुलेखनपद्धतीचीं मूलतत्त्वें सांगावीं म्हणजे त्यांना लहानपणापासूनच फायदा होईल. लघुलेखनपद्धतीचा जसजसा फैलाव होईल तसतशा अडचणी दूर होऊन पद्धत पूर्णावस्थेस जाईल.

रा. रा. मराठे यांनी तयार केलेलीच पद्धति सर्वांनी ग्राह्य धरावी असें या लेखान्वयें सांगावयाचें नसून, त्यांची पद्धति पडताळून पाहून त्यांत जरूर तें कमी जास्त करून एक संपूर्ण व सर्वमान्य लघुलेखनपद्धति प्रचारांत येणें मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी किती महत्त्वाचें आहे तें स्पष्ट करावयाचें आहे.

—न. का. घारपुरे.

## 'शिरकाण' याचा मूळ अर्थ काय ?

अलीकडे आपण 'शिरकाण' म्हणजे शिर्के यांची संभाजीने जशी कत्तल केली तशी कत्तल, तसा सर्वनाश, असा अर्थ करतों. पण बखरींत "शिर्के जेथें असतील तितके मारावे अशी आज्ञा करून शिरकाण करविलें" असें जेव्हा मल्हार रामराव चिटणीस संभाजीच्या बखरींत लिहितो तेव्हा त्याच्या मनांत अनुप्रास साधून शिरकाण याच्या 'द्वारें नाश' अशा अर्थाचा शब्द घालण्याची इच्छा होती हें निश्चित वाटतें. हा शब्द शिरकंड, शिर-खंड (श्रीखंड म्हणजे चंदन या शब्दाचा अपभ्रंश) असावा असें मी सुचवितों. हे शब्द मोल्स्वर्थने 'गंध', 'चंदन' अशा अर्थी दिले आहेत. 'शिर्के यांचें शिरकाण केलें' याचा मूळ अर्थ "शिर्के यांचें चंदन केलें" असा असावा. मूळ अर्थ विसरून तात्पर्यार्थ म्हणजे 'कत्तल', 'नाश' असा आपण स्वीकारतों असें मात्र वाटतें. माझी कल्पना बरोबर आहे काय ? 'शिरस्कंदन' हा मूळ शब्द धरल्यास शिरकांडण असें मराठींत रूप होईल; 'शिरकाण' असें होणार नाही.

## 'यागी' का 'वागी'?

मल्हार रामराव चिटणीसकृत संभाजी-चरित्राच्या बखरींत अंक ६ मध्ये "ते समयीं अकबर म्हणून पातशाहाजाने यागी होऊन देशीं आले" असें साने यांनी छापिलें आहे. 'यागी' याचा अर्थ काय ? 'वागी' असा शब्द आहे त्याचा अर्थ Disloyal, rebellious असा कोशांत दिलेला आहे. खरा पाठ 'वागी' असावा असें सुचवावेंसें वाटतें ! 'यागी' याचा अर्थ साने यांनी पूर्वीच्या आवृत्तींत दिला नव्हता, पण नवीन आवृत्तींत 'नाखूष, त्रासलेला' असा दिलेला आहे. पण याला आधार काय ?

—वा. म. जोशी.



# पुरोगामी लेखकांच्या मागण्या

[ गेल्या नोव्हेंबरमध्ये मुंबअी येथे पुरोगामी लेखकपरिषद् तेथील कांही साहित्यिकांच्या आमंत्रणावरून भरविण्यांत आली होती. श्री. वरेरकर हे स्वागताध्यक्ष असून श्री. पु. ह. पटवर्धन हे अध्यक्ष होते. परिषदेंत खालील तीन ठराव मंजूर झाले. त्यावरून मराठीच्या श्रीनीवरील लेखकांच्या मोहिमेची दिशा ध्यानांत येअील. ]

## १ लेखकांच्या मागण्या

लेखकवर्ग हा विचारक्षेत्रांतील महत्त्वाचा कार्यकर्ता असून राष्ट्रीय संस्कृति व स्वातंत्र्य यांचें संवर्धन करण्याचें काम तो करीत असतो. यामुळे त्याला समाजघटनेमध्ये आघाडीचें व मानाचें स्थान मिळणें आवश्यक असतें.

तथापि आजच्या संस्कृतीमध्ये कारखान्यांत काम करणाऱ्या कामगारांसारखाच तो अेक यांत्रिक गुलाम बनलेला असल्याने बेकारी, जीविताची अशाश्वति, अपुऱ्या वेतनामुळें अुपासमार वगैरे भयंकर आधीव्याधींत तो कामगारांप्रमाणेच सापडलेला आहे. यामुळे त्याची कल्पनाशक्ति व कार्यप्रेरणाशक्ति नष्ट होअून पोटाकरता त्याला निःसत्त्व, व मनोरंजनाच्या नांवाखाली घाणेरडें लिखाण करावें लागतें. अशा परिस्थितींत त्याच्या हातून स्वातंत्र्य व संस्कृतिसंवर्धनाचें कार्य होणें अशक्य होतें. म्हणूनच राष्ट्राची अभिवृद्धि व्हावयाची तर लेखकांवरील ही संकटपरंपरा नष्ट करून त्यांच्या प्रेरक शक्तींना पूर्ण वाव मिळणें अवश्य आहे. या हेतूने ही परिषद्—

(१) लेखकांच्या हक्करक्षणाकरिता त्यांची संघटना असणें अवश्य आहे;

(२) तसेंच वृत्तपत्रांतून काम करणाऱ्या लेखकांस कमींत कमी ७५ रु. तरी पगार मिळावा; रात्रपाळीकरिता अधिक सवलती मिळाव्या. पगार दरमहा व महिना पुरा होतांच मिळावा;

(३) लेखकांनी विनामोबदला व्यावसायिक पत्रांतून लेख लिहूं नयेत;

(४) सरकारने शिक्षणक्रमाची योजना, अितिहाससंशोधन, क्रमिक पुस्तकांची निवड, शास्त्रीय विषयांवर देशी भाषांत पुस्तकें लिहिणें वगैरे कामांमध्ये लेखकांच्या संस्थांचें सहकार्य घ्यावें;

अशा मागण्या करीत आहे.

## २ मुद्रणस्वातंत्र्य

लोकशाही संस्कृतीचा विकास समाजाच्या विचारसंपन्नतेवर अवलंबून आहे. विचारसंपन्नता वाढविण्याचें बलिष्ठ साधन मुद्रणसंस्था होय. म्हणूनच मुद्रणसंस्थेच्या समृद्धीवरून समाज व राष्ट्र यांचा सांस्कृतिक दर्जा ठरत असतो.

हिंदी मुद्रणसंस्था—वृत्तपत्रें व नियतकालिकें यांचें महत्त्व तर अधिकच आहे. आधुनिक भौतिक शास्त्रांनी सिद्ध केलेलें ज्ञान समाजांतील सर्व वर्गांना नेअून पोचवून अेकराष्ट्रीय अशी संकलित संस्कृति निर्माण करण्याचें सर्वसामान्य कार्य हिंदी वृत्तपत्रें करीतच असतात. पण

अनुक्रमणिका

शिवाय राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा अुभारून त्याची संघटना करण्याचें कार्यहि ती तेजस्वीपणाने करीत आहेत. अर्थात् कोणत्याहि बाह्य निर्बंधांपासून मुद्रणसंस्था अलिप्त असेल तरच तिला हें महत्तम कार्य करतां येअील. या कारणांमुळे मुद्रणसंस्थेच्या स्वातंत्र्याचा प्रश्न हिंदी राष्ट्राला व त्याच्या लेखकवर्गाला अत्यंत जिव्हाळ्याचा वाटतो. म्हणून या परिषदेची अशी मागणी आहे की,—

(१) हिंदी स्वातंत्र्य व संस्कृति यांचें संवर्धन करणाऱ्या मुद्रणसंस्थेवर विचारांची गळचेपी करणारीं बंधनें असूं नयेत.

(२) सामाजिक हितांना हानिकारक होअील अशा तऱ्हेने अत्याचारांना चिथावणी देणाऱ्या लेखांखेरीज दुसऱ्या कोणत्याहि मतांचा पुरस्कार केल्याबद्दल लेखक व वृत्तपत्रें यांजवर खटले भरले जाअूं नयेत.

(३) या व बदनामी, अब्रूनुकसानी वगैरेसारख्या लेखांबद्दल प्रत्यक्ष लेखकाशिवाय मुद्रक, प्रकाशक आदि कोणाहि व्यक्तीला जबाबदार धरूं नये व छापखाने जप्त केले जाअूं नयेत.

(४) मतस्वातंत्र्याच्या तत्त्वास हरताळ फासणारीं १२४ अ सारखीं कलमें अिं. पि. कोडमधून काढून टाकावीं. तसेंच सी कस्टम्स ॲक्टमधील पुस्तकांवरील निर्बंधांचीं कलमें रद्द व्हावीं म्हणून मध्यवर्ती कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासद व प्रांतिक सरकारनी खटपट करावी.

## ३ राष्ट्रीय संस्कृतीचें संरक्षण

राष्ट्रीय संस्कृतीचा अभिमान हें जिवंतपणाचें किमान लक्षण आहे. पण तिच्या लक्षणांची व विकासाची स्पष्ट कल्पना नसल्याने तिच्या संवर्धनाकरिता म्हणून पुरस्कारिलेल्या कृतीचा परिणाम तिला हानिकारक असा होत असतो. विशेषतः समाज अेका पद्धतींतून दुसऱ्या पद्धतींत जात असतांना असा घोटाळा माजत असतो. हा आधुनिक जगांतला सार्वत्रिक अनुभव हिंदुस्थानांतहि आजकाल प्रत्ययाला येत आहे.

जुन्या सरंजामी पद्धतींतील संस्कृति, धर्म, वर्ण जातिवाचक होतीं. यामुळे त्या पद्धतीच्या अमदानींत हिंदुस्थानाला अेकराष्ट्रीयत्वाचें स्वरूप कधीहि प्राप्त झालें नाही. आधुनिक संस्कृति आमूलाग्र अशा निराळ्याच तऱ्हेच्या श्रमविभागाच्या तत्त्वावर अुभारलेली असून व या श्रमविभागांत सर्व धर्म, वर्ण व जाति यांना सारखाच वांटा अुचलतां येत असल्याने आजची संस्कृति अेकराष्ट्रीय बनत आहे. ज्या भौतिक ज्ञानावर ही संस्कृति अुभारली आहे त्याचा हा नैसर्गिक परिपाक असल्याने या भौतिक व अेकराष्ट्रीयत्वाच्या वाढीला प्रतिकूल अशा कृति व विचारसरणी मूलतः हानिकारक होत.

धर्म, वर्ण व जातिवाचक श्रमविभागाच्या पद्धतीचा मोड करून अेकराष्ट्रीयत्व वाढविणें हें आधुनिक भौतिक संस्कृतीचें कार्य आहे. पण तें कार्य तिच्या हातून नीटपणें पार पडत नाही. कारण जुन्या संस्कृतींतील भेदवाचक तत्त्व तिनेहि स्वीकारलें असून जाति व वर्ण यांअैवजीं ती समाजांत वर्गवाचक भेद अुत्पन्न करीत आहे. यामुळे वरकरणीं अेकराष्ट्रीयत्वाचा आव आणूनहि तिने राष्ट्रांत वर्गवाचक फूट पाडून बहुजनसमाजापासून भौतिक ज्ञानाचें फळ हिरावून घेतले आहे. म्हणून राष्ट्राच्या सर्वांगीण अुत्कर्षाला आधुनिक म्हणजेच भांडवली संस्कृति अत्यंत हानिकारक ठरलेली आहे. याकरिता भौतिक संस्कृतीचें लक्ष्य सर्वांगीण उन्नति हें आहे हें ओळखून लेखकांनी या अुन्नतीच्या आड येणाऱ्या वरील दोन्हीहि भेदवाचक पद्धति भयंकर

प्रतिगामी आहेत हें जाणून व त्यांचा अुच्छेद करून राष्ट्राच्या सर्वांगीण अुन्नतीवर अुभारलेल्या संस्कृतीचें संवर्धन करण्याची पराकाष्ठा केली पाहिजे. या दृष्टीने या संवर्धनाच्या आड येणाऱ्या तत्त्वांचा व शक्तींचा बहुजनसमाजास परिचय करून देअून व त्यांचा अुच्छेद करण्याचे मार्ग दाखवून त्याकरिता त्यांस संघटित करण्याचे निकराचे प्रयत्न पुरोगामी लेखकांनी केले पाहिजेत, अशी या परिषदेची आग्रहाची घोषणा आहे.

## महाराष्ट्र-कोशमंडळाची योजना

### नवीन कोश

महाराष्ट्र शब्दकोशाचे कामसमाप्तीनंतर शब्दकोशमंडळाने पुढे कोणतें कार्य हातीं घ्यावें याबद्दल विचारणा झाल्याने श्री. य. रा. दाते व श्री. चिं. ग. कर्वे यांनी इंग्रजी-मराठी-कोशाची विस्तृत योजना तयार केली आहे. या कोशाचें हस्तलिखित तयार करण्यास तीन व छापण्यास पांच वर्षें लागतील असा अंदाज असून, त्याचें काम सुरू असतांच त्या अनुषंगाने जमविलेल्या माहितींतून पुढील पांच संदर्भग्रंथ प्रसिद्ध करण्याचा कोशमंडळाचा विचार आहे. (१) शास्त्रीय परिभाषाकोश, (२) कोकणी, मराठी कोश, (३) शब्दघटना व शब्दप्रयोगकोश, (४) वाङ्मयसारकोश, (५) प्रसिद्ध स्थळकोश.

## कै. नारायण नरसिंह फडणीस

जळगांवचे वयोवृद्ध साहित्यसेवक "काव्यरत्नावली"कार श्री. नारायण नरसिंह फडणीस हे गेल्या विजयादशमीस कालवश झाले. रा. फडणीस हे स्वतः मार्मिक रसज्ञ व कवि होते. "काव्यसुभाषित" हा त्यांचा ग्रंथ त्यांच्या रचनाकौशल्याची साक्ष पटविणारा आहे. तथापि रचनेपेक्षा अुत्तेजन व प्रकाशन या मार्गांनी त्यांनी मराठी कवितेची अमूल्य सेवा केली. आपली 'काव्यरत्नावली' अनेक वर्षें यशस्वी रीतीने चालवून अनेक लहान मोठ्या कवींना त्यांनी पुढे आणिलें आणि अुदंड कविता प्रकाशित केली. 'प्रबोधचंद्रिका' हें नियतकालिक त्यांच्या बाबजी प्रिंटिंग प्रेसमधून निघत असतें. मराठी कवितेच्या लता-वृक्षांना अुत्तेजनप्रकाशनाचें खतपाणी घालणारा हा मालाकार आता दिवंगत झाला आहे. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो.

# साहित्यिकांचे विचार



## पुरोगामी वाङ्मय

आज पुरोगामी वाङ्मय कोणत्या वाङ्मयास म्हणावें हें निश्चित नाही. पुरोगामी वाङ्मयाचा अुगम मानवी जीवनाच्या प्रगतींत आहे असें मला वाटतें. स्वातंत्र्याच्या मार्गाचा पाठपुरावा करणारें, विचारांना चालना देणारें व मनुष्यास कार्यप्रवृत्त करणारें असें जें वाङ्मय तें पुरोगामी वाङ्मय होय अशी पुरोगामी वाङ्मयाची स्थूल मानाने व्याख्या करतां येईल. आज मराठी भाषेंत निर्माण होणारें वाङ्मय वरील व्याख्येंत बसेल काय ? कांही वाङ्मय संस्कृतीचें संरक्षण करण्याकरता निर्माण केलें जावें म्हणतात. पण संस्कृति म्हणजे काय ? आज आपल्या समाजांत व्यक्तिस्वातंत्र्य कोठेहि राहिलेलें नाही. या दृष्टीने पाहतां आजच्या साहित्यिकांनी स्वर्गीय सृष्टि सोडून देअून सत्यसृष्टींत आलें पाहिजे व वास्तवतेच्या जगांतील गोष्टींचें निरीक्षण करून अन्यायाचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

साहित्यिक हा शारदेच्या मंदिरांतील अुपासक आहे. तो तिच्या मंदिरांत जाअून तिची अुपासना करणारा असतो. शारदेचें मंदिर पवित्र असलें तरी त्याच्या पायाला धरणीकंपाचे धक्के बसत आहेत. प्रसुप्त ज्वालामुखीच्या तोंडावर बसलेल्या स्थितीप्रमाणे आज आपली स्थिति झालेली आहे. आज आपण मजा करतों पण अुद्या तो ज्वालामुखी भडकल्यावर आपली कोणती परिस्थिति होणार आहे याचा विचार फार थोड्या लेखकांनी केलेला आहे. आज समाजांत कोणता विचारप्रवाह चालू आहे याचा पूर्ण अभ्यास गेला पाहिजे. आणि या विचारप्रवाहाची बरोबर माहिती असणारा तोच खरा पुरोगामी साहित्यिक. साहित्यिकाची पहिली खूण म्हणजे त्याची व्यापक सहानुभूति ही होय. सत्यं, शिवं, सुंदरम् अशी उत्तम साहित्याची व्याख्या केली जाते. पण सत्यं, शिवं, सुंदरम् याचा अर्थ काय ? दररोज पूजा अर्चा करणाऱ्या ब्राह्मणाला कीं ज्याला त्याचा अर्थ माहीत नाही त्याने ते शब्द अुचारले तर ते अपवित्र होत नाहीत. पण विचारवंतांनी आजच्या साहित्याबद्दल सत्यं, शिवं, सुंदरम् हीं अक्षरें अुच्चारणें म्हणजे आत्मवंचना होय ! आज सत्यं, शिवं, मांगल्य असें काय आहे ? आज आमच्या देशांतील समाजांत वावरणारें सत्य समाजसेवकांची मनोवृत्ति बेफाम बनवितें. सत्यं म्हणजे काय, शिवं म्हणजे काय ? समाजांत स्वातंत्र्य राहावें, मांगल्य राहावें असें वाटत असेल तर समाजाला नवीन मार्ग दाखविण्याची जबाबदारी आजच्या साहित्यिकांवर पडते. त्यांना ती पेलवत नसेल, तें ध्येय दृष्टीसमोर ठेववत नसेल तर सत्यं, शिवं, सुंदरम् व मांगल्य वगैरेंच्या थापा सोडून देअून त्यांनी त्या क्षेत्राच्या बाहेर पडावें.

आज वाङ्मयामध्ये समाजशास्त्राचा अुपयोग केला की झालों आपण पुरोगामी अशी कांहींनी आपली कल्पना करून घेतली आहे. मला त्यांना असें सांगावयाचें आहे की त्यांनी तंत्राचें ढोंग माजवूं नये. अेखादा मिठाअीवाला आपल्या मिठाअीवर ज्याप्रमाणे पिस्ते-बदामाचे काप पेरतो त्याप्रमाणे तंत्र हें दिखाअू आहे. पुरोगामी राहावयाचें असेल तर त्यांनी मानवी भविष्याबद्दल कांही आकांक्षा धरून लिखाण लिहिलें पाहिजे. अमुक अेक गोष्ट केली किंवा

अनुक्रमणिका

वाङ्मयांत समाजसत्तावाद आणला की झालों पुरोगामी असें पुरोगामित्वाचें कांही लक्षण ठरलेलें नाही ! समाजाच्या नव्या जाणीवा, नव्या गरजा अितरेजनांकडून होणारा तीव्रतर विरोध यांचीं मूळ कारणें शोधून काढून तीं निरसन करण्याचा, त्यांचा समूळ नाश करण्याचा प्रयत्न करणें हेंच खरें पुरोगामित्वाचें लक्षण होय. असें करतांना मग तुम्ही 'सदाशिव पेठी वाङ्मय' निर्माण केलेंत तरी मी तुम्हांस पुरोगामी लेखक म्हणेन.

आजचे साहित्यिक अुथळपणाने व थिल्लरपणाने विचार करतांना दिसतात. तो अुथळपणा व थिल्लरपणा जरा टाकून देअून त्यांनी थोडीशी वंडखोर वृत्ति धारण केली पाहिजे. या वंडखोर वृत्तीचें किंचित् प्रदर्शन विभावरी शिरूरकर या लेखिकेने केलें तर कोण गहजब तिच्यावर ! "विभावरीने अश्लील वाङ्मय निर्माण केलें, अश्लील वाङ्मय निर्माण केलें" अशी आरडाओरड सर्वत्र चालू झाली. मीं स्वतः विभावरीचीं पुस्तकें वाचलीं आहेत. मला तर अगदी पहिल्या पानापासून तों शेवटच्या पानापर्यंत विभावरीच्या अेकाहि पुस्तकांत अेकदाहि अश्लीलतेची कल्पना शिवली नाही. तुमच्या जीवनामधील असलेल्या त्या वास्तवपूर्ण चित्रणांत जर दांभिकता असेल तर विभावरीच्या वाङ्मयांत दांभिकता आहे. नाही तर तीं अगदी वास्तवपूर्ण व सत्य चित्रें आहेत. ज्यांचें जीवनच दांभिक व अवास्तव आहे त्यांना तीं चित्रें दांभिक आणि अवास्तव अशीं वाटतात.

वाङ्मयांत आज समाजवाद रंगवला तरच तें पुरोगामी होतें असा कित्येकांचा कयास आहे. पण वाङ्मयास समाजवादाचा किंवा कोणत्याहि वादाचा प्रश्न नाही. मला अेवढेंच सांगावयाचें आहे की 'सत्यं, शिवं, सुंदरम्' च्या नांवावर अथवा मांगल्याच्या नांवावर समाजाची प्रगति थांबेल असें कोणतेंहि वाङ्मय तुम्ही निर्माण करूं नका. नवमतवादाचें वाङ्मय म्हणजे निरीश्वरी वाङ्मय असें कित्येकांच्या मनाने घेतलें आहे. वास्तवपूर्ण वाङ्मय निर्माण करा व त्यांतील चित्रें रंगवितांना तीं सहानुभूतीने व हळुवार हाताने रंगवा. मराठी वाङ्मयांत व्हिक्टोरियन टाअीपचीं आज जीं चित्रें दिसतात तीं वास्तववादी करा. तुकारामचित्रासारखें प्रतिगामी चित्र निर्माण करूं नका. तुकाराम, ज्ञानेश्वर हे आपापल्या काळांत पुरोगामी होते. त्यांचें वाङ्मय जनमनाची पकड अुत्तम रीतीने घेत असे. माझें असें म्हणणें की स्वतः तुकाराम प्रतिगामी नव्हता पण त्याचा पंथ प्रतिगामी आहे. नवमतवाद किंवा पुरोगामित्व हे धर्माच्या विरुद्ध नाहीत.

श्री. पु. ह. पटवर्धन—अध्यक्षीय भाषण. पुरोगामी लेखक परिषद्, मुंबई.

## पुरोगामी वाङ्मय म्हणजे काय ?

राजकीय क्षेत्रांत रशियाने प्रवेश केलेलाच आहे. अितरहि अनेक क्षेत्रांत रशियाचा प्रवेश होत आहे व आता जेव्हा त्याचा प्रवेश वाङ्मयांतहि होअूं लागला तेव्हा आता वाङ्मयांत लाल बावटा फडकणार असें बऱ्याच लोकांना वाटूं लागलें; व ते समाजवादाचा व वाङ्मयाचा संबंध काय असले प्रश्न विचारूं लागले आहेत. पण त्यांना आमचें असें म्हणणें आहे की, समाजसत्तावाद हा वाङ्मयाचा विशेष प्रकार नसून जीवनाचें तत्त्वज्ञान हेंच समाजसत्तावादी वाङ्मय होय. ज्या वाङ्मयाने समाजाची अुत्क्रांति होते तेंच समाजसत्तावादी वाङ्मय. आतापर्यंतचे कवि काल्पनिक कथांचें चित्रण करीत. परंतु समाजसत्तावादी लेखक हे जीवनांतले खोल प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करतात. जीवनाकडे डोळे अुघडे ठेवून बघण्यास जें वाङ्मय

शिकवितें तेंच आम्हांला पाहिजे; व पुरोगामी वाङ्मयांत याच तत्त्वाचा पुरस्कार असल्यामुळे त्याचीच आम्हाला गरज भासते. वाङ्मयांत लाल बावटा फडकाविण्याचें ध्येय समोर ठेवावयाचें नाही. रशिया काय अगर हिंदुस्थान काय दोनहि ठिकाणीं तुम्हांला पुरोगामी लेखकांप्रमाणे प्रतिगामी लेखकहि आढळतील. पुरोगामी याचा अर्थ नीट लक्षांत घ्या. आधुनिक सर्वच लेखक हे पुरोगामी आहेत व जुने सर्वच लेखक प्रतिगामी आहेत असा गैरसमज करून घेऊं नका. कार्याच्या स्पष्टीकरणार्थ मी रशियाचेंच अुदाहरण देतों. बुलिनच्या सर्व कादंबऱ्या चांगल्या आहेत व तो अगदी आधुनिक लेखक आहे. पण त्याचें लिखाण प्रतिगामी स्वरूपाचें आहे. याच्या अुलट मॅक्झिम गॉर्की हा त्याच्यां पूर्वीचा लेखक असूनहि तो पुरोगामी वाङ्मय लिहिणारा होता. बुलीन असें म्हणतो की सध्या रशियांत जी क्रांति होत आहे ती सर्वस्वीं वाअीट आहे. पण गॉर्कीच्या वाङ्मयांत असा निराशेचा सूर आपल्याला आढळणार नाही. त्याच्या लिखाणांत रशियांतील क्रांति ही अुन्नतीच्या मार्गाकडे नेणारी आहे असेंच प्रतिपादन व ध्वनि दिसेल; पण ह्यावरून बुलीनचें वाङ्मय टाकाअू आहे असा गैरसमज करून घेऊं नका. प्रो. फडके यांच्यावर ते प्रतिगामी स्वरूपाचें वाङ्मय लिहितात, नुसतीं मध्यम वर्गाचीं चित्रें रेखाटतात अशी टीका केली जाते. पण मला त्यांचें वाङ्मय प्रतिगामी असें वाटत नाही. आपल्याकडील बहुतेक सर्व लेखक मध्यम वर्गातले किंवा पांढरपेशा वर्गातले आहेत. त्यांना शेतकऱ्यांची माहिती येणार कुठून ! तेव्हा आपण लेखकांना अमकें लिहा असा आग्रह करण्याअैवजीं खरीं चित्रें रंगवा अेवढें म्हणूं शकतों.

अनंत काणेकर, नागपूर येथील व्याख्यान.

## पुरोगामी लेखक

राजकारणांत किंवा अर्थकारणांत ज्याप्रमाणे भिन्न विचारप्रणालीवर पक्षसंघटना केली जाते त्याचप्रमाणे भाषावार प्रान्तरचनेचा विचार न करतां साहित्यिक क्षेत्रांतहि तत्त्वप्रधान संघटना करण्याचा हा अेक अुपक्रम आहे असें म्हणणें हें अधिक सयुक्तिक होअील. या परिषदेने स्वतःला पुरोगामी हें नांव धारण केलें आहे, व तें या परिषदेच्या ध्येयाचें व धोरणाचें अुत्कृष्ट निदर्शक आहे. हिंदुस्थानांतील धर्मकारणांत ज्याप्रमाणे सनातनी व पुराणमतवादी हा अेक पक्ष नेहमी डोकें वर काढतो, व प्रगतीला विरोध करून सुधारकी विचारसरणीवर हल्ला चढवीत असतो, त्याचप्रमाणे साहित्यक्षेत्रांतहि अेका सनातनी पंथाचें अस्तित्व वरचेवर भासमान होतें; अेवढेंच नव्हे तर साहित्यिक सनातनींची जात ही साहित्यप्रगतीच्या मार्गातील अेक धोंडच आहे, असाहि कित्येकदा अनुभव येतो.

साहित्याला खची करणाऱ्या ह्या सनातनी विचारमर्यादेच्या बाहेर पडणारा जो लेखकवर्ग तो पुरोगामी लेखकवर्ग असें म्हणावयास हरकत नाही. समाज हा जसा नेहमी प्रगमनशील आणि विकासक्षम असतो त्याचप्रमाणे साहित्य हेंहि पुरोगामी व नवविचारशाली असणें हें मानवी जीवनाच्या विकासाला आवश्यक असतें. बाबावाक्यं प्रमाणं, हा सिद्धान्त सामाजिक सुधारणाक्षेत्राप्रमाणे साहित्यक्षेत्रांतहि अनुपयुक्त मानणारा जो स्वतंत्र विचारांचा लेखकवर्ग त्याला पुरोगामी लेखकवर्ग असें नांव देतां येअील. पुरोगामी या शब्दाला गेल्या कांही वर्षांत आणखीहि कांही विशिष्ट प्रकारचा अर्थ प्राप्त झाला आहे. पुरोगामी लेखक हा ध्येयवादाचा पुरस्कर्ता असतोच पण जुन्या ध्येयवादाशीं जो जुना नीतिवाद निगडीत झालेला

होता, तो पुरोगामी लेखकांना रुचणार नाही. ध्येयवाद, वास्तववाद व नवनीतिवाद यांचा पुरोगामी लेखकांकडून केला जाणारा पुरस्कार हा वेदवाक्यापेक्षा विज्ञानावर, श्रुतीपेक्षा शास्त्रांवर, परंपरागत रूढींपेक्षा परिस्थित्यधिष्ठित आर्थिक गरजांवर, आणि भावनावशतेपेक्षा तर्कप्रतिष्ठित बुद्धिवादावर आधारलेला असतो; व त्यामुळे पुरोगामी लेखकांच्या शब्दकोशांत अभिजातता, सदभिरुचि, संस्कृतिरक्षण, पावित्र्यपुरस्कार, कलोपासना, धर्म वगैरेंच्या व्याख्या आणि लक्षणें ही प्रतिगामी लेखकांच्या रूढ शब्दकोशांतील वर्णनापेक्षा भिन्न असणें स्वाभाविक असतें. पुरोगामी लेखकाला निसर्गाधिष्ठित व शास्त्रशुद्ध लैंगिक विचार वावडा वाटत नाही! पण त्याचा अर्थ पुरोगामी लेखक हा लैंगिक स्वैराचाराचा पुरस्कर्ता असतो असा जर कोणी करूं लागेल तर तो निव्वळ खोडसाळपणा आणि निषेधार्ह विपर्यासाचा नमुनाच होईल.

—ज्ञानप्रकाश, कृ. ग. लिमये (अग्रलेख).

## साहित्य व जीवन

साहित्याची महती गातांना आपण नेहमी म्हणतों की मनुष्यजीवनाला प्रेरणा देणारी ही एक जबरदस्त शक्ति आहे. पण आपण हेंहि तपासलें पाहिजे कीं साहित्याला प्रेरणा कोठून मिळते. धीरोदात्त किंवा उत्कृष्ट जीवनावांचून भावोत्कट साहित्य तयार होणारच नाही. पराक्रम—मग तो स्वतःचा असो किंवा दुसऱ्याचा असो, आंतरिक जीवनांतील असो किंवा बाह्य घटनेंतील असो, व्यक्तिगत असो किंवा समाजगत असो, पराक्रमच साहित्याला खरी प्रेरणा देतो. जीवनाच्या व्याकूळ वेदनांतून देखील साहित्य निर्माण होतें. पण तेथे देखील ती वेदना म्हणजे पराक्रमाची प्रसववेदना असते म्हणूनच साहित्याला प्रेरक असते. जें साहित्य पराक्रमाला पारखें झालें तें स्वतः तर क्षीण होतेंच पण ज्या समाजांत तें पसरतें त्या समाजाला देखील अल्पसंतोषी, अदूरदृष्टी आणि क्षीणवीर्य बनवितें. जर हृदयाला मारून टाकणारें, सर्व भावनांची अक्षयतृतीया करणारें साहित्य हवें असेल तर केवळ शब्दसृष्टीची अुपासना करून चालावयाचें नाही. जीवनामध्ये तारुण्य, पराक्रम, श्रद्धा, अुत्साह, आणि आर्यत्व वाढत आहेत किंवा नाहीत हेंच आपण प्रथम पाहिलें पाहिजे. जीवन जर गंभीर आणि वेगवान असेल तर साहित्य आपोआप पौष्टिक आणि चैतन्यधन होअील. अशेष जीवनांत किंवा त्याच्या अेखाद्या पैलूमध्ये जेव्हा चैतन्य मुसमुसूं लागतें तेव्हा समृद्ध साहित्य आपोआप निर्मित होअूं लागतें.

हल्ली नवमतवादाची चर्चाहि वरीच चालते; हें नांव बरेंच भ्रामक आहे. जुनें तेवढें सर्वच वाअीट असतें आणि नवीन सर्वच चांगलें असतें असें जोपर्यंत सिद्ध झालें नाही तोपर्यंत नवमतवाद या शब्दयोजनेला स्वतःचा कांहीच अर्थ नाही. नाविन्याखातर नाविन्य येवढ्याच वृत्तीने जर कोणी वागूं लागला तर दर रात्रीं नव्या तरुणीशीं लग्न लावणाऱ्या आणि सकाळीं अुठतांच ती जुनी झाली म्हणून तिचा शिरच्छेद करणाऱ्या स्वच्छंदी बादशाहासारखी अशा लोकांची स्थिति होअील. आणि अशा लोकांना पिसाळलेल्या कुत्र्याला जसें वागवितात तसें वागवावें लागेल.

समाज पुष्कळ वेळां जागृत नसतो; स्वतःच्या गफलतीने स्वतःची परिस्थिति बिघडवीत असतो. त्यामुळे घरचीं भांडीं जशीं वारंवार घासावीं लागतात, घर ज्याप्रमाणे वारंवार कचरा काढून साफ ठेवावें लागतें, त्याप्रमाणे सामाजिक आदर्श वारंवार तपासून साफसूफ करावे लागतात. ज्ञानांत आणि अनुभवांत जसजशी भर पडेल तसतसा आदर्शांतहि फेरफार करावा

लागतो. पण येथे देखील समाजहिताविषयी अुत्कट कळकळ बाळगून आणि हिंमतपूर्वक प्रयोग करून सामाजिक आदर्शांत परिवर्तन करणें किंवा क्रांति करणें हें निराळें, आणि अगदी लेटेस्ट फॅशन काय आहे हें पाहून बाजारांत रोज नवीन हॅट विकत घेणाऱ्या अेखाद्या फ्रेंच ललनेचें अनुकरण करणें निराळें. गांधीजींची भाषा बोलल्याने व त्यांचें बाह्य अनुकरण केल्याने ज्याप्रमाणे महात्मा होतां येत नाही त्याचप्रमाणे पाश्चात्यांचे ताजे ताजे ग्रंथ वाचून त्यांची भाषा आणि त्यांची विचारसरणी यांची परेड केल्याने नवमतवादी किंवा प्रागतिक होतां यावयाचें नाही. स्वतः निरीक्षण परीक्षण करून, स्वतः प्रयोग करून आणि प्रयोग करण्यासाठी जी जीवनरूपी किंमत द्यावी लागते ती देअून जे पुनीत झाले आहेत आणि समर्थ झाले आहेत त्यांच्या चळवळीलाच तीं नांवें देतां येतील.

जे लोक म्हणतात तुमचें ध्येय आणि तुमचे आदर्श आम्ही ओळखत नाही; साहित्य हा आमचा आजीविकेचा केवळ धंदा आहे; यथेच्छ पैसे मिळविणें हा आमचा अुद्देश आहे; लोकरंजन हें साधन आहे; युनिव्हर्सिटी, शिक्षणखातें वगैरे आमचीं कुरणें आहेत; प्रकाशकांशीं आम्हांला वर्गविग्रह चालवावा लागतो; रंगभूमि आणि सिनेमा हीं आमच्या भाग्योदयाचीं क्षेत्रें आहेत, याच्या बाहेर आम्हांस जावयाचें नाहीं, आणि जे कोणी जातील यांची टर अुडविल्यावांचून आम्ही राहणार नाही. सामाजिक अभिरुचि आज आमच्या ताब्यांत आहे. लोक तुमची स्तुति करीत असतील पण भर आमचीच करतात, तेव्हा आमचा हा चारुवाक लोकायतिक मार्ग आम्हीं कां सोडावा ! खरोखर कां सोडावा याला अुत्तर काय देणार ! आणि अशा वातावरणाचा विरोध तरी कसा करणार ! पण जगांत वीट म्हणून अेक वस्तु आहे; विकृत अभिरुचि देखील दीर्घकाल टिकत नाही. थोडीशी मोकळी हवा सुटतांच कोंदटपणाची दुर्गंधि दूर होते. समाजाच्या स्वास्थ्याविषयी निराश होण्याचें कारण नाही. पण आदर्शांची अुपसूचना, समाजाची सेवा आणि जीवनाची आर्यता याविषयींचे प्रयत्न अखंड चालू असलेच पाहिजेच.

महाराष्ट्राला सध्या रहस्यवादाचें अजीर्ण झालें असावें असें दिसतें. ज्ञानेश्वरीपासून अगदी शुकरंभा-संवादापर्यंत सर्व महाराष्ट्रीय साहित्य रहस्यवादाच्या रंगानेच रंगलें आहे. पण आता आपल्या येथे रहस्यवादाचें बावडें बाळगलें जातें. शून्यवाद म्हणून त्याची हेटाळणीहि करण्यांत येते, आणि शून्यवाद किंवा रहस्यवादाच्या जागीं वास्तववादाचा पुरस्कार केला जातो. मला वाटतें या रीतीने या दोन्ही वादांना आपण अन्याय करतों. रहस्यवाद हा ध्येयवादाचाच अेक प्रकार आहे.

मनुष्याचें जीवन जेवढें अनुभवास येतें त्याहून अधिक खोल आहे, गूढ आहे, याविषयी शंका नाही. मनुष्यजीवन जर पुरें पुरें आपल्याला कळलें तर प्रगतीला अवकाशच राहणार नाही, आणि सगळीं पानें दिसल्यानंतर ज्याप्रमाणे खेळांत मौज राहत नाही त्याप्रमाणे जीवनांत जगण्याचा आनंदहि राहणार नाही. समुद्रांतील हिमनग ज्याप्रमाणे वर दिसतात त्याच्या आठपट नअूपट पाण्यांत असतात, त्याप्रमाणे मनुष्यजीवन वर वर दिसतें त्याच्याहून पुष्कळच गूढ आणि अज्ञात आहे. ह्या गूढ जीवनाचा अनुभव अर्थातच सगळ्यांना सारखा येत नाही. कांही लोकांना जो कांही अलौकिक अनुभव येतो तो त्यांना तर्कानें सिद्ध करून देतां येत नाही. अेवढेंच नव्हे तर, शब्दांनी तो नीटपणें व्यक्तहि करतां येत नाही. आणि असें असूनहि तो अितका कांही अुत्कट आणि महत्त्वाचा असतो की तो व्यक्त केल्यावांचून

राहवत नाही. अशा स्थितींत जे केवळ तत्त्वज्ञानी असतात ते मौन धारण करून डोलूं लागतात; जे अुन्मत्त होतात ते हा ऽ ऽ अू हा ऽ ऽ अू म्हणून गाअूं लागतात आणि जे कलाधर असतात ते अगदी अपुऱ्या साधनाने अस्पष्ट रूपाने त्याला व्यक्त करूं लागतात; याचा परिणाम असा होतो की ज्यांना तसाच अनुभव असेल त्यांना खूणगांठ पटून ते अगदी तल्लीन होतात; जे त्या वाटेवर असतील त्यांना वीज चमकावी आणि क्षणमात्र दूरचें दिसावें त्याचप्रमाणे दिशादर्शन होतें. जे केवळ कल्पनाप्रवीण आहेत त्यांच्या हृदयांत तऱ्हेतऱ्हेचीं चित्रें अुमटून ते अस्वस्थ होतात आणि सतारींतील तरफेच्या तारा सहानुभूतीने वाजूं लागतात त्याप्रमाणे तेहि कवि बनूं लागतात आणि भाषा कमाविली जाअून तिच्यांत नवीन सामर्थ्य प्रकट होतें. अशा रीतीने निर्माण झालेलें आणि प्रतिष्ठा पावलेलें ध्येयवादी साहित्य रहस्यवाणी बोलूं लागल्याने, गूढगुंजन करूं लागल्याने भावनाधन लोकांमध्ये प्रतिष्ठा पावतें. सामान्य जन-समुदाय श्रद्धाजड असल्याने अशा साहित्याचें अंधपारायण करून त्याची प्रतिष्ठा आणि त्याचें आयुष्य वाढवीत असतो आणि भोंदू लोकांना अशा साहित्याच्या गूढवाणीचें व्याकरण सांभाळून स्वतःहि रहस्यवादी असल्याचें ढोंग करणें सोपें जातें, आणि मग धीर नसलेल्या समाज-सुधारकांना या भोंदू लोकांची साथहि नको आणि त्या जीवनवीरांचें तें तेजस्वी रहस्यवादी साहित्यहि नको असें वाटूं लागतें. आधुनिक दृष्टान्त देअून सांगावयाचें म्हणजे आंघोळीच्या घंगाळी हौदांतील पाण्यांत जर मूल डुंबत असलें तर त्या घाणेरड्या पाण्यावरोवर त्यांत डुंबणारें मूलहि फेकून द्या असें म्हणणाऱ्या त्रासिक काकासारखी या लोकांची स्थिति असते.

—काका कालेलकर,

सरस्वती मंडळ, कल्याण, अध्यक्षीय भाषण.

## प्रचारक कथा

वास्तवता आणि ध्येय यांचें समीकरण झालें नाही तर तें कथावाङ्मय कितीहि आकर्षक झालें तरी प्रचारात्मक होणार नाही. कथेच्या संकलित वाचनाने ध्येयाची जाणीव वाचकाला जर झाली नाही तर ती कथा कितीहि मनोरंजक असली, कितीहि कलात्मक असली तरी परिणामकारक होणार नाही. वाचकांवर परिणाम करणें, त्यांच्या सुप्त मनोवृत्ति जागृत करणें, डिंवचून त्यांना अुत्तेजन देणें ज्या कथेच्या द्वारें साधत नाही ती कथा वाङ्मयदृष्ट्या हिणकस ठरेल. ज्याला कलात्मक लिखाण असें म्हणतात त्या लिखाणाने होणारा आनंद तात्कालिन असतो. पण प्रचारात्मक कला वाचकावर कायमचा ठसा उमटवूं शकते. वाचलेल्या कथेची स्मृति वाचकावर अितकी ठसली पाहिजे की ती विसरणें वाचकाला अशक्यप्राय होअून बसलें पाहिजे, वाचनानें वाचकाच्या हृदयांत जखम झाली पाहिजे. आणि ज्या अशा विशिष्ट प्रकारच्या अुद्दिष्टासाठी जखम करण्यांत आली असेल तें अुद्दिष्ट साध्य होअीपर्यंत त्या जखमेंतून स्मृतीचा स्राव वाहत राहिला पाहिजे. प्रचारात्मक वाङ्मय आकर्षक करणें सोपें नाही. प्रचारासाठी कलेला दासीसारखी राबवून घेण्याची हिंमत ज्याच्या लेखणींत नसेल त्याला विचारप्रक्षोभक वाङ्मय निर्माण करणें असाध्य आहे. आणि म्हणूनच असल्या दुःसाध्य प्रयत्नांना हात घालण्याची हिंमत ज्यांच्या अंगीं नाही ते लेखक राणीला टाकून दासीच्या पायांवर लोळण घेतात. आणि हा आपला न्यूनगंड लपविण्यासाठी 'कलेसाठी कला' ह्या ब्रीदवाक्याचा डांगोरा पिटीत असतात. प्रचारात्मक कथाहि जशी रचनेच्या दृष्टीनें आकर्षक पाहिजे तशीच भाषेच्या

दृष्टीनेहि अत्यंत सुबोध पाहिजे. भाषेचें अवडंबर माजविणाऱ्या, बाह्यसौंदर्याची भुरळ घालणाऱ्या आणि सामाजिक जीवनांतील सांदीकोपऱ्यांत लपून राहिलेलीं दुःखें चव्हाट्यावर मांडण्याइतकें धैर्य नसणाऱ्या लेखकांच्या लेखणींतून अुतरलेलें वाङ्मय म्हणजे मुडद्यावरचा शृंगार होय. तिथे सौंदर्य दागिन्याला असतें. जीव निष्प्राण असतो.

—भा. वि. वरेरकर,
श्री. मा. कृ. शिंदेकृत देवपूजा आणि इतर गोष्टी, प्रस्तावना.

## भावगीत

भावगीत हा प्रकार असा आहे की त्यांत जेवढें पाहावें तेवढें अधिकच सौंदर्य दिसतें. तंत्रदृष्ट्या तें अगदी लहानसें, साधें, नादप्रचुर असलें तरी वृत्तीने तें नाट्यकाव्य, महाकाव्य, कथाकाव्य, वगैरे सर्व काव्यप्रकारांच्या अुगमस्थानीं आहे. सर्वच काव्य अखेर भावगीतात्मक असतें. अेखाद्या महासागराच्या विस्ताराकडे आपण पाहत राहिलों तर त्याच्या अथांगपणांत, त्याच्या गंभीर निनादांत, त्याच्या विविध रंगांत मनाला स्वतःचा विसर पडतो. त्या क्षितिज-स्पर्शी विस्ताराच्या मानाने अेखादा जलबिंदु म्हणजे किती लहान, त्याहून किती वेगळा ! परंतु प्रकृतिदृष्ट्या तो जलबिंदु व तो महासागर पूर्ण समानधर्मी. त्याचप्रमाणे भावगीताची वृत्ति व अितर सर्व काव्यप्रकारांची वृत्ति अेकच असते. ती म्हणजे काव्यात्मक वृत्ति. अुत्कट प्रतीतींत ही वृत्ति अुगम पावते व प्रतिभाशाली कल्पकतेच्या अपरिहार्य स्फुरणाने ही मूर्त स्वरूप घेते. मग ती स्वतः कवीच्या मुखाने बोलेल व भावगीताचें स्वरूप घेअील, तर कधी निरनिराळ्या पात्रांचा आडोसा घेअून नाट्यरूपाने अवतरेल, तर कधी निरनिराळ्या प्रसंगांच्या किंवा घटनांच्या द्वारें कथारूपाने जें दर्शवून द्यायचें तें देअील. कोणत्याहि प्रकाराचा तिने अवलंब केला तरी काव्याचा अुगम व काव्याची परिणति या वृत्तींतच आहे.

—श्री. आ. रा. देशपांडे (फुलोरा–प्रस्तावना).

## अक्षय आनंदाचें स्थान

साहित्याचें हें अेकच क्षेत्र असें आहे की ज्या ठिकाणीं सर्वांनी समानतेच्या भावनेने अेकत्र येण्यास कशाचाहि हरकत नसावी. पूर्वीच्या आपल्या भक्तिमार्गी संतांनी विठ्ठलभक्ति हें अेक असेंच सर्वांना प्रेमाच्या भावनेने अेकत्र आणण्याचें क्षेत्र निर्माण केलें होतें. ज्ञानदेव आणि नामदेव, सावतामाळी आणि चोखा महार, गोरा कुंभार आणि सेना न्हावी, इ. संत मंडळी आणि त्यांचे असंख्य अनुयायी सामाजिक व्यवहारांत कदाचित् अेकत्र येत नसतीलहि; परंतु भजनानंद अुपभोगण्याकरिता ते खात्रीने अेक होत. अक्षय आनंदाचें तें स्थान सर्वांना सारखेंच मोकळें असे. सध्याच्या काळीं भक्तिसुखाच्या सोहळ्याचें तें स्थान आजच्यासारख्या साहित्यो-त्सवांनी घेतलें आहे. साहित्याच्या या क्षेत्रांत कोणाला मज्जाव तर नसावाच, अुलट सर्वांना आदराचें व प्रेमाचें स्थान मिळावें. सर्वांनी समानतेच्या भावनेने यांत सामील होअून साहित्यो-पासनेचा आनंद अुपभोगावा.

आपल्या साहित्यसंस्था अशा सर्वसंग्राहक वृत्तीने काम करीत असतीलच अशी मी अपेक्षा करतों. अशा वृत्तीने जर त्या काम करीत नसतील तर त्यांचें अस्तित्व ही सार्वजनिक दृष्ट्या आपत्तिच ठरेल. हा हिंदु, हा मुसलमान, हा ब्राह्मण, हा ब्राह्मणेतर, हा राष्ट्रसभावाला,

हा हिंदुसभावाला, हा भांडवलवाला, हा समाजवादी, हा पुरोगामी, हा प्रतिगामी, हा पुणेकर हा नागपूरकर असले भेद मनांत ठेवून आपण जर आपल्या साहित्यक्षेत्रांत निरनिराळे पक्ष उत्पन्न करूं लागलों तर या साहित्यसंस्था म्हणजे समाजांत दुही फैलविण्याचें अेक साधनच होअून बसेल. साहित्यविषयक कार्यात अशा तऱ्हेचे भेदभाव मानण्याचें कांहीच कारण नाही. भाषेची सेवा आणि वाङ्मयाची अभिवृद्धि हाच अेक समान अुद्देश सर्व साहित्यविषयक कार्याच्या मुळाशीं असणार; तेव्हा तुमची जात, तुमचा पक्ष, तुमचीं मतें कोणतींहि असोत, साहित्याची अभिवृद्धि हें अुद्दिष्ट सर्वांस सारखेंच मान्य असल्यामुळे सर्वांस या संस्थांमधून व मंडळांमधून सारखाच वाव मिळाला पाहिजे......

## लोकभाषांचें भविष्य

आपल्या देशांत ज्या लोकभाषा आहेत त्यांना यापुढे मोठा अुर्जितावस्थेचा काल येणार आहे, असें मला वाटतें. जसजसें स्वराज्य जवळ येत जाअील तसतसें आमच्या लोकभाषांचें भाग्य अुदयाला येईल. शिक्षणक्रमामध्ये, कोर्टकचेऱ्यांमध्ये, सरकारी कामकाजामध्ये आणि सर्व प्रकारच्या सामाजिक व्यवहारांमध्ये त्या त्या प्रांताच्या लोकभाषेला प्रमुख स्थान मिळालें पाहिजे असा आग्रह धरून त्यासाठी शक्य तो प्रयत्न केल्याखेरीज स्वराज्यवादी मंत्रिमंडळें खात्रीने राहणार नाहीत. परंतु त्या प्रयत्नास जोराचा पाठिंबा आणि धडाडीचें साहाय्य साहित्यपरिषदांसारख्या संस्थांकडून मिळाल्याशिवाय हे प्रयत्न जावे तसे सिद्धीस जाणार नाहीत. या बाबतींत प्रभावी लोकमत तयार करणें व त्यासाठी जोराचा प्रचार व चळवळ करणें हें खरोखरी आपल्या साहित्यपरिषदेसारख्या संस्थांचें काम आहे. अशा प्रकारच्या चळवळीचें व मतप्रचाराचें काम आपल्या संस्थेने हातीं घेतल्यास आपल्या संस्थेची अुपयुक्तता उत्कृष्ट रीतीने सिद्ध होअील.

आणखी अेका निराळ्या दृष्टीने पाहिलें असतां देखील प्रांतिक भाषांचा भविष्यकाळ असाच अुज्ज्वल असल्याचें माझ्या बुद्धीला भासमान होतें. लोकमतानुवर्ती व लोकहितदक्ष अशा मंत्रिमंडळाकडून, परिस्थितीच्या अनुकूलतेप्रमाणें शिक्षणप्रसाराचा नेटाचा प्रयत्न केला जाणार हें अगदी अुघड आहे. अर्थात् समाजाची साक्षरता व त्याबरोबरच वाचनाची आवड हीं यापुढे वाढणार यांत शंका नाही. निकटवर्ती भविष्यकाळांत होणाऱ्या या प्रगतीचीं चिन्हें ओळखून साहित्यपरिषदांनी कंबर कसून कामास लागण्याचें मनांत आणलें तर केवढें तरी अफाट काम आपल्यापुढे अुभें आहे असें यांत दिसून येअील. शहरांतून व विशेषतः खेड्यापाड्यांतून राहणारा जो अफाट समाज यापुढे साक्षर होणार आहे त्याच्यामध्ये वाचनाची आवड अुत्पन्न करण्याचें आणि अुत्पन्न झालेली टिकविण्याचें काम अनेक दिशांनी साहित्यसंस्थांसच करतां येअील. सोपीं, मनोरंजक व ज्ञानप्रद अशीं पुस्तकें निर्माण करून त्यांचा अल्प किंमतींत सगळीकडे प्रसार करण्याचा चिकाटीने यत्न केल्यास खेड्यांतील शिक्षण संपविलेल्या मुलांची साक्षरता कायम ठेवून त्याला ज्ञानसंपादनाच्या मार्गाला कसें लावावयाचें हा जो प्रश्न आज सर्वांपुढे दत्त म्हणून अुभा आहे तो बऱ्याच अंशीं सोडविल्यासारखें होअील. तात्पर्य, लोकभाषांमधील वाङ्मयाच्या अभिवृद्धीस यापुढील काळ अत्यंत अनुकूल असा येणार आहे हें जाणून सामान्य लोकांस समजेल व रुचेल असें वाङ्मय निर्माण करण्याच्या कार्यास वाङ्मयसंस्थांनी धडाडीने लागलें पाहिजे. ही संधि जर आपण फुकट दवडली तर आळशावर गंगा येअूनहि तो जसा कोरडाच राहिला तशांतली आपली गत होअील. नवीन साक्षर होणारा जनसमाज

यथोचित मार्गदर्शनाच्या अभावीं आणि चांगल्या पुस्तकांच्या पुरवठ्याच्या अभावीं हीन व गलिच्छ वाङ्मय वाचण्याच्या नादीं लागला किंवा वाचनाची संवय गमावून पुनः निरक्षर होण्याच्या मार्गास लागला तर त्या दोषाचें खापर कोणावर फुटेल ? देशांतील प्रत्येक व्यक्तीच्या सर्व आयुष्याची जिम्मेदारी सरकार थोडीच घेअूं शकणार आहे ? सरकार अेकेका व्यक्तीला अेकवार शिक्षण देअून साक्षर करून सोडील यापेक्षा जास्त कांही करणें सरकारच्या शक्तीच्या बाहेरचें आहे. त्या साक्षरतेचा आपल्या जीवनांत अुपयोग करून घेअून त्या व्यक्तीने चौकस, बहुश्रुत व सुसंस्कृत बनावें यासाठी करावयाचा जो प्रयत्न तो देशांतील विचारी नेत्यांकडून आणि वाङ्मयवृद्धीचें ध्येय डोळ्यापुढे ठेवणाऱ्या वाङ्मयसंस्थांकडूनच झाला पाहिजे. त्यांना तो प्रयत्न सुलभ रीतीने करतां येअील व त्यांनी केलेला प्रयत्न चिरस्थाअीहि होअील.

पंतप्रधान डॉ. ना. भा. खरे यांचें म. सा. परिषदेच्या मध्यप्रान्त शाखेच्या सम्मेलन-प्रसंगीं उद्घाटनभाषण. नागपूर, ११-१२-३७

---

# बन्धमुक्त वाङ्मय (मुंबाअि प्रान्त)

| | ग्रंथ | लेखक : प्रकाशक |
|---|---|---|
| १ | टिळकांचें अल्प चरित्र | लक्ष्मण रामचंद्र पांगारकर |
| २ | लोकमान्य बाळ गंगाधर टिळक व प्रो. शिवराम महादेव परांजपे यांचेवर सन १९०८ सालीं झालेले राजद्रोहाचे खटले | हरि रघुनाथ भागवत, शंकर गजानन पुरोहित, लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, गणेश सदाशिव मराठे आणि कृष्णाजी नारायण कवडे |
| ३ | मुस्ताफा केमाल पाशा | रामचंद्र नारायण मंडलिक |
| ४ | विजापूरच्या अदिलशाहीचा शेवट अथवा श्रीशिवराय छत्रपतींचीं अद्भुत कारस्थानें | नारायण बळवंत हर्डीकर |
| ५ | टिळकांचीं भाषणें | हरि रघुनाथ भागवत |
| ६ | 'काळ'वरील राजद्रोहाचा खटला सन १९०८ | गोविंद धोंडदेव दंडवते |
| ७ | शांततामय संग्रामांतील खानदेशचे विजयी वीर–पोवाडा | |
| ८ | कै. लो. टिळकांच्यावरील खटल्याची अधिकृत व साग्र हकीकत | न. चिं. केळकर |
| ९ | भाल्याची फेकी भाग १ व २ | मा. ब. भोपटकर |
| १० | राष्ट्रीय कुसुमावली | फत्तेचंद लल्लुभाई |

---

# जवाहरलाल नेहरू

## आत्मचरित्र

[अनुवादक : नारायण गणेश गोरे; प्रकाशक : सुलभ राष्ट्रीय ग्रन्थमाला, पुणें, २; किं. ५ रु.]

राष्ट्रपति पं. जवाहरलाल नेहरू यांच्या जगविख्यात आत्मचरित्राचें हें मराठी रूपांतर नारायणराव गोरे यांनी केलें आहे. हें अुत्कृष्ट पण अवघड कार्य तडीस नेल्याबद्दल श्री. गोरे यांचा गौरव करण्यापूर्वी या अपूर्व कामीं योजना झाल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे. 'पिलग्रिम्स प्रोग्रेस', 'गीतारहस्य' इ० कित्येक जगन्मान्य ग्रंथांप्रमाणे मूळ दिव्य ग्रंथ कारागृहाच्या अंधारांत जन्मास आला. ह्या आत्मचरित्राचे लेखक आज राष्ट्राचे कंठमणि झालेले आहेत. त्यांची परंपरा थोर आहे आणि या विस्तीर्ण देशाच्या भाग्यरथाचें सारथ्य त्यांच्याकडे आलें आहे. पंडितजी विद्वान आहेत, पण बहुजनसमाजाच्या तळमळीपुढे पांडित्यप्रकर्ष त्यांना कांहीच वाटत नाही. त्यांचा दृष्टिकोण शास्त्रशुद्ध असला तरी वृत्ति भावनाप्रधान व काव्यमय आहे. व्यक्तित्व जबरदस्त असूनहि शिस्त व शालीनता सुटलेल्या नाहींत. ह्या सर्व अलौकिक गुणांचा परिपाक प्रस्तुत ग्रंथांत पाहावयास सापडतो. आणि म्हणूनच या रमणीय ग्रंथाला अितकें जगन्मान्यत्व मिळालें आहे.

मूळ ग्रंथाची भाषा जितकी अस्सल इंग्रजी तितकीच मनोवेधक आहे. तींत अलंकार नाहीत हें अेकपरी अुत्तम झालें. कारण तिच्या नैसर्गिक कांतीपुढे ते दिपलेच असते. आत्मचरित्राचा लेखक अभिजात आहे याचें प्रत्यंतर शब्दाशब्दांत दिसतें. परंतु अभिजातपणामुळे मनमोकळेपणा विचकतो असें मुळीच नाही. पंडितजी कर्मयोगी आहेत. अर्थात् समाज, व्यक्ति, राजकारण, राष्ट्रभाषा अित्यादि विषयांच्या अंतरंगावर ते सुंदर प्रकाश पाडतातच. परंतु मध्येच अंतर्मुख होअून आंतरवेदनांचें चित्रण व विवेचनहि ते तितक्याच सरळपणाने व कौशल्याने करतात. अेका प्रचंड राष्ट्राच्या स्वराज्यविषयक लढ्याचा अितिहास त्यांतल्या प्रमुख राष्ट्रवीराने रेखाटलेला वाचावयास मिळणें ही या ग्रंथाची स्थूल अुपयुक्तता झाली. पण अेका प्रभावसंपन्न व्यक्तीचें आत्मनिवेदन अत्यंत हृदयंगम भाषेंत अैकायला सापडणें हीच या ग्रंथाची खरी योग्यता. जग या ग्रंथकौस्तुभाला सदैव कंठीं धारण करील.

साहजिकच या ग्रंथाचें रूपांतर हें अेक अतिशय अवघड काम होय. पण गोरे यांनी तें मोठ्या हुशारीने पार पाडलें आहे यांत शंका नाही. आणि याचें कारण अनुवादकाला लागणारे सर्व गुण भाअी गोरे यांच्या अंगीं आहेत हें होय. गोरे यांचा इंग्रजी वाङ्मयाचा व्यासंग विद्यालयांत प्रसिद्ध होता. त्या वेळीं मराठी भाषेचेहि ते मार्मिक अभ्यासक होते. आणि त्यांच्या लेखणीला लिहिण्याचा चांगला सराव आहे. तथापि याहूनहि सांगण्यासारखा विशेष गुण मला वाटतो तो हा की राष्ट्रकार्यी हाल सोसून बहुजनसमाजाच्या अंतरंगापर्यंत ते पोचलेले आहेत. पं. नेहरूंच्या स्फूर्तिपद शिकवणीने ज्या युवक देशभक्तांच्या दृष्टीला व कार्याला नवें वळण लागलें त्यांपैकी गोरे हे अेक होत. म्हणजे अुभयभाषाप्रभुत्वाप्रमाणेच आत्मचरित्रलेखकाचें

अनुयायित्व हीहि अेक लायकी भाअी गोरे यांनी मिळवून ठेविली होती. या दृष्टीने अनुवादाचें काम त्यांच्याकडे देण्यांत प्रकाशकांनी गुणग्राहकता दाखविली हें खरें. आणि ग्रंथ वाचल्यावर आमच्या म्हणण्याचा प्रत्यय प्रत्येकाला येअील. श्री. गोरे यांचें आत्मचरित्रविषयावरच नव्हे तर मराठीवरहि प्रेम आहे हें स्पष्ट होतें.

"कितीहि काळ लोटला व कितीहि दूरदूरच्या देशांत प्रवास झाला तरी घराकडची ओढ कायम राहते. कोणत्याहि निर्वासिताला हा पायगोळा तोडणें शक्य होत नाही." (But in spite of the passage of many years and long wandering, the pull of the home remains. No exile can escape the malady of his tribe.) अशीं वाक्यें कुठल्याहि पानावर आढळतील. नाभा संस्थानांतील 'विष्कंभक,' 'भरत-वाक्य' इ० प्रकरणांचे मथळे देखील समर्पक आहेत. यांतील राजकीय चर्चेचा भाग तर वाचकांनी वारकाअीने वाचावा. समाजवादावर अुभारलेल्या तत्त्वचर्चेचें अितकें अस्सल मराठी रूपांतर क्वचितच पाहण्यांत येतें. या यशस्वितेला गोरे यांचें भाषाप्रभुत्व तर कारण झालेंच आहे पण बहुजनसमाजाशीं आलेल्या गाढ संबंधामुळे व प्रत्यक्ष कार्यामुळे त्यांच्या भाषेला अितकी सुबोधता आली आहे असें म्हणणें वावगें होणार नाही.

चर्चा, अितिहासकथन अित्यादि भागांत जितकी सफाई व चतुरता अनुवादकांनी दाखविली तितकी सफाई व चतुरता या पुस्तकांतील आत्मनिवेदनपर अुत्कट भाग मराठींत रेखाटतांना दाखविली असती तर या अनुवादाला अवर्णनीय शोभा आली असती. आणि अुत्कट भाग या ग्रंथांत थोडेथोडके नाहीत.

"पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतीच्या संमिश्र रांध्यापासून मी निर्माण झालों आहें. माझें सूत कुठेच जमत नाहीं, मी कोठेहि नांदत नाहीं" (पृ. ६०६).

या अप्रसन्न अनुवादावर टीका करण्यापेक्षा मूळ अुताराच तुलनेकरितां दिलेला बरा.

"I have become a queer mixture of the East and West, out of place everywhere, at home nowhere" (Page 597).

"शुक्लपक्षाचें कौमुदीहास्य आणि कृष्णपक्षाच्या निबिड छाया मीं कितीतरी वेळ पाहिल्या असतील" (पृ. ६०७).

यांतील गोळाबेरीज अर्थ बरोबर आहे आणि निव्वळ मराठी वाचकाला खुलवील अशी भाषाहि पडली आहे. परंतु—

"How many moon I have seen wax and wane......"(Page 598).

—याचा अर्थ वरील वाक्यांत बरोबर अुतरला आहे असें म्हणतां येअीलसें वाटत नाही. कारण छायाप्रकाशाचा केवळ विरोधच नव्हे तर चंद्राच्या वाढत्या आणि अुगवत्या कलांचा पंडितजींनी दाखविलेला चक्रनेमिक्रम रहस्यसूचक आहे. अनुवादांत अेवढया छटा अुमटलेल्या नाहीत.

"जरेची दृष्ट तिला कधी लागलीच नाही" (पृ. ५७०) हें कै. सौ. कमलादेवींचें केलेलें वर्णन असेंच मूळच्या मानाने दुबळें आहे. मूळांत पंडितजी म्हणतात—

"There was nothing matronly about her" (Page 562).

अशा तऱ्हेने अनुवादाची भाषा कोठे कोठे बाह्यतः सुंदर दिसली तरी, अेक ती मूळाहून फारच अलंकृत आहे, दुसरें मूळांतील अर्थध्वनीच्या किंवा वातावरणाच्या सर्वच छटा तींत अुतरलेल्या नाहीत.

अनुवादांत असा फरक पडण्याचें कारण अेकच आहे असें वाटतें. आणि तें म्हणजे मूळ लेखक व अनुवादक यांच्यांतील वृत्तिविरोध होय. अर्थात् हा विरोध भाषेंतहि प्रतिबिंबित होतो हें सांगणें नकोच. पं. जवाहरलाल यांच्या भाषेंत सरपळणा, शुद्धता, वेधकता हीं भरपूर आहेत. मूळ भावना जेवढ्या वजनाची तेवढीच भाषाहि यावयाची. भावनाच मोठी असल्याने भाषाहि भव्य व परिणामकारक वाटते. परंतु गोरे यांचा प्रकार वेगळा दिसतो. त्यांची भाषा प्रियमंडना आहे. परिणाम करण्यासाठी ती भरपूर अलंकार चढवील. भावनेचा कण घेअून त्यावर अिमारत अुठविणें यांत ती धन्यता मानते. म्हणूनच मूळ वेधक वाक्यांची प्रतिकृति अुठवितांना अतिरंजित शब्द वापरण्याचा मोह त्यांना झाला असावा.

पण हें तुलनात्मक दृष्टीने वाचणारांच्या दृष्टीने पाहणें झालें. हा अनुवाद निव्वळ मराठी वाचकांकरिता आहे. पं. जवाहरलालजींचें अुदात्त चरित्र व शिकवण मराठी वाचकांना कळण्याच्या दृष्टीने हा अनुवाद फारच अुपयुक्त ठरेल. अितका सुंदर अनुवाद भाअी गोरे यांनी अल्प वेळांत ज्या तडफेने केला ती तडफ तर थोड्या मंडळींतच आढळते. पुस्तकाची छपाअी व बांधणी अंतरंगसौंदर्याला साजेशीच आहे. नेहरूमंडळीचीं मनोहर चित्रें पुस्तकाला अधिकच शोभा देतात. महाराष्ट्रवाङ्मयाच्या भाषांतरशाखेला आलेलें हें फळ सरस व मधुर आहे.

—गोपीनाथ तळवलकर.

---

# कालिदासाची सृष्टि

[लेखक व प्रकाशक: प्रो. मा. दा. अळतेकर, अेम्. अे., प्रभावती-निवास, पार्क रोड, व्हिलेपार्ले, मुंबअी नं. २४; किंमत २। रुपये.]

कालिदासाच्या काव्यकृतींबद्दल आजपर्यंत अनेक देशी विदेशी, नव्या जुन्या व लहानथोर पंडितांनी आणि रसिकांनी निरनिराळ्या दृष्टींनी पुष्कळच लिहिलें आहे. खुद्द मराठींतहि असलें लिखाण कांही कमी आहे असें नाही. असें असतां 'हा नवीन ग्रंथ कशासाठी!' असा प्रश्न वाचकापुढे अुभा राहतो. त्याला अुत्तर अेकच. कालिदासाच्या काव्यांच्या वाचनाने मनाला होणारा निरतिशय आनंद पृथक्करणपद्धतीने व्यक्त करून त्याच्याबद्दल वाटणारी आपली कृतज्ञताबुद्धि सादर प्रकट करावी व या भावनांनी भारावलेल्या मनाला अुद्गाराने हलकें करावें असें प्रत्येक रसिकाला वाटतें. आपल्या देशाच्या या थोर कवीला लवून मुजरा करण्याचा अधिकार सर्वांचाच आहे. या दृष्टीने प्रो. अळतेकरांच्या सदर मराठी ग्रंथाचें मनःपूर्वक स्वागत रसिक करतील याविषयी शंका नाही.

वरील तऱ्हेची आदराची भावना ही सर्वांनाच समान असली तरी ती व्यक्त करतांना प्रत्येकाची दृष्टि व हेतु निरनिराळी असतात. कोणी संशोधक म्हणून कालिदासाच्या स्थलकालनिर्णयाचा प्रयत्न करतो, कोणी समाजशास्त्रज्ञ म्हणून कालिदासाच्या समाजव्यवस्थेचें निरीक्षण करतो, कोणी तुलनात्मकभाषाशास्त्रविशारद त्याच्या शब्दांचें व वाक्यविशेषांचें पृथक्करण करतो तर कोणी केवळ रसिक म्हणून कालिदासाच्या काव्यामृताचे गोड घुटकेच घेत बसतो. प्रो. अळतेकर यांना या महाकवीचा "राष्ट्रीय कवि" म्हणून वाचकांस परिचय करून द्यावयाचा आहे. म्हणजे प्राचीन भारतवर्षाच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक श्रेष्ठ कल्पना व

अुमद्या आकांक्षा कालिदासाच्या काव्यांत कशा प्रतिबिंबित झाल्या आहेत हें त्यांस विशद करून दाखवयाचें आहे. त्यामुळे अेका अर्थी त्यांची दृष्टि सर्वसंग्राहक आहे व म्हणून त्यांच्या विवेचनांत राष्ट्रीय व सांस्कृतिक असें सर्व कांही थोड्याफार प्रमाणांत आलें आहे. या सर्व विषयांची अैसपैस चर्चा प्रो. अळतेकर यांनी आपल्या नेहमीच्या भरघोस व मैदानी व्याख्यान-पद्धतीने रसाळ मराठींत केली आहे. निव्वळ मराठी वाचकाला कालिदासीय काव्यांचा सर्व-साधारण परिचय या ग्रंथाने फार चांगला होअील.

प्रो. अळतेकरांचें कालिदासाविषयींचें सर्व विवेचन त्यांच्या आदरबुद्धींतून जन्म पावलेलें, राष्ट्राभिमानाने पोसलेलें व रसिकत्वाने बहरलेलें आहे. याच त्रिवेणीसंगमाचा संमिश्र ओघ त्यांना वाचकाच्या मनोभूमीवरून वाहवावयाचा आहे. त्यामुळे साहजिकच त्यांची दृष्टि शास्त्रीय व काटेकोरपणाची (scientifically precise) न राहतां ती केवळ सामान्य परिचयात्मक, अंदाजी व बहुजनरोचक (popular) आहे. त्या योगाने प्रो. अळतेकरांनी दिलेली सर्वसामान्य माहिती ज्या संस्कृतज्ञ वाचकांस आगाअूच आहे त्यांस त्यांच्या विवेचनांत कांही विशेष चमकदार, आकर्षक, व मांडणींत किंवा रसोद्ग्रहणांत नवीन असें कांही फारसें आढळून येत नाही.

कालिदासाच्या स्थल-काल-निर्णयाचें नवीन काम फार बिकट व संस्कृतच्या संशोधनांत जन्म घालविलेल्या अधिकारी विद्वानानेच तें करण्याजोगें म्हणून प्रो. अळतेकरांनी तो विषय सोडून दिला असल्यास तें ठीकच झालें. पण वर दर्शविल्याप्रमाणे कालिदासकालीन समाज-व्यवस्थेचें, संस्कृतीचें व काव्यसौंदर्याचें विवेचन करतांना तरी त्यांची दृष्टि आहे याहून अधिक चिकित्सक व अभ्यासप्रवण असावयास पाहिजे होती अशी अिच्छा निदान संस्कृतज्ञ वाचकांना होते. ही अपेक्षा प्रो. अळतेकरांसारख्या व्यासंगी विद्वानांकडून करण्यांत कांही वावगें होतें असें वाटत नाही.

कालिदासाच्या काव्यांतून व्यक्त होणाऱ्या सामाजिक व सांस्कृतिक कल्पना बऱ्याचअंशीं ध्येयभूत (ideal), अद्भुतरम्य व शक्याशक्यतेच्या कसावर कसोशीने न घासलेल्या अशा आहेत. 'असें असें असेल तर किती बरें रम्य देखावा दिसेल !' या गोड तंद्रींत सदिच्छेच्या कुंचलीने त्याने त्या चित्रित केल्या आहेत. पण अशाहि कल्पनांचा खरा रसास्वाद रसिकास चाखवावयाचा असल्यास, या केवळ काव्यमय कल्पनांना खऱ्या अैतिहासिक परिस्थितीचें व या विषयावरील जुन्या नव्या ग्रंथांतील वचनांचें अधिष्ठान विवेचकाने द्यावयास पाहिजे. म्हणजे थोडी वस्तुस्थिति व अुरलेलें काव्य असें हें मिश्रण अधिक चविष्ट होतें. नाही तर बाणाने शूद्रकाच्या राज्यवैभवाचें वर्णन करतांना म्हणावें "विवाहे अेव करग्रहणम्" व चिकित्सक रसिकाने "हा अर्थशास्त्रीय कल्पनेचा श्लेषाच्या वाऱ्यावर सोडलेला अेक रम्य बुडबुडा आहे." येवढीच त्याची किंमत मानावी असें होतें. प्रो. मिराशी यांनी आपल्या पुस्तकांत गुप्तनृपालांच्या खऱ्याखुऱ्या अैतिहासिक पार्श्वभूमिकेवर कालिदासाच्या काव्यकल्पना विवरून दाखविल्यामुळे त्यांना विशेष गोडी आली आहे. मेघदूतांतील वैभवशाली उज्जयिनीचें वर्णन कालिदासाने "स्वर्गलक्ष्मीच्या वैभवाचा अेक तुकडा" असें केलें आहे किंवा दिलीपाच्या राज्यांत 'चोरी' हा शब्द केवळ लोकांच्या अैकिवांत होता" असें सांगितलें आहे. या काव्यमय अतिशयोक्तीची खरी गोडी मुळांत खऱ्या असलेल्या दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या वैभवशाली राजवटीच्या अुल्लेखानेच अुत्पन्न झाली. कारण रसिक म्हणतो "पन्नास

पाअुणशे टक्के तरी सत्याच्या तिवअीवर आधारलेला कल्पनेच्या झिलअीचा काव्यसुवर्णकलश मला सहज मान्य होअील!" यासाठी अग्निमित्र, विक्रमादित्य, गुप्त किंवा भोजसुद्धा—जो कोणता राजा प्रो. अळतेकरांस कालिदासाच्या आश्रयदाता म्हणून संमत असेल—त्याच्या कालाची अैतिहासिक छाननी व स्थलाची भौगोलिक निश्चिति त्यांनी करावयास पाहिजे होती. व त्या पायावर कालिदासाच्या पूर्वी व आसपास झालेल्या मनु, आपस्तंब, अित्यादि स्मृत्या, कामंदकीय नीतिसार, कौटिलीय अर्थशास्त्र, शुक्रनीति, इत्यादि ग्रंथ, समकालीन किंवा पूर्वोत्तरकालीन अितर कवि इत्यादिकांतील कल्पनेच्या सजावटीने कालिदासाच्या हृद्य काव्यकल्पनांची अुभारणी त्यांनी केली असती तर त्यांचें विवेचन वाचकांची अधिक खात्री पटविणारें व म्हणून त्यांच्या ध्येयासहि अधिक पोषक झालें असतें.

'राष्ट्रकवि' म्हणूनच जर कालिदासाची ओळख करून द्यावयाची तर तो कवि नुसत्या कल्पनासृष्टींतच वावरणारा आहे असा वाचकांचा ग्रह होअून काय अुपयोग? तीच गोष्ट काव्यसौंदर्याची आहे. नुसतें काव्यसौंदर्य करमणुकीचें साधन मात्र होतें. त्याने राष्ट्रकवित्व सिद्ध होत नाही. बौद्धधर्माचा पाडाव व्हावयास लागून ब्राह्मणधर्माच्या पुनरुज्जीवनाचे जोमदार कोंब आर्यावर्तांत फोफावूं लागले होते, वैदिक धर्माभिमानी कवि आपल्या संस्कृतीचें श्रेष्ठत्व विजयाच्या अभिमानाने ललकारीत होते, अशा वेळीं कालिदास झाला व वैदिक धर्माच्या कल्पनांचा जोराने पुरस्कार करून त्याने बौद्धतत्त्वाची पिछेहाट झालेली शाकुंतलांत रंगविली असें बंगालच्या रे नांवाच्या पंडिताप्रमाणे मानलें तर "प्रवर्ततां प्रकृतिहिताय पार्थिवः" या शाकुंतलांतील अुदात्तगंभीर भरतवाक्याची कशी काव्यमय संगति लागते पाहा! कालिदास अेव्हाना कविश्रेष्ठ म्हणून मान्यता पावला होता, राजाश्रयामुळे त्याने सर्व अैहिक सुखें भोगली होतीं, आतां त्याला आपल्या आयुष्याचें पैलतीर दिसूं लागलें होतें, कदाचित् "माझ्या लेखणींतून हें शेवटचेंच भरतवाक्य बाहेर पडत आहे" अशी कल्पना त्या महाभागाच्या मनाला चाटून गेलीहि असेल. अशा वेळीं वैदिकधर्माभिमानी, वैदिक संस्कृतिपुरस्कर्ता व वयोवृद्ध अशा या राष्ट्रकवींद्राने आपल्या आवडत्या देवतेजवळ (भगवान् चंद्रमौलीजवळ) काय मागणें मागावें? तर मोक्ष, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका व राजांनाहि आपल्या धर्मबांधवांच्या कल्याणासाठी आपल्या अधिकारयुक्त काव्यवाणीने त्याने काय सांगावें तर "बाबांनो! या अवघड काळीं प्रजेच्या हितासाठी झटा. नुसतें तिचें अनुरंजन करूं नका. बौद्धधर्मावर पूर्ण मात झाली पाहिजे. तसेंच वैदिक ब्राह्मणांच्या विद्येचा गौरव करा" (बुद्ध श्रमणांचा नको).

काव्याला स्थलकालाचें अधिष्ठान व त्यांत वर्णिलेल्या स्त्रीपुरुषांना अैतिहासिक व जिवंत व्यक्तिमत्व दिलें म्हणजे तें काव्य व त्या सांस्कृतिक कल्पना कशा अुठावदार होतात याचें अेक अुदाहरण म्हणून या श्लोकाचें थोडें विवेचन येथे केलें.

हीच गोष्ट त्यांच्या काव्यसौन्दर्यवर्णनांत झाली आहे. नाटकांबद्दल लिहितांना त्यांनी कालिदासाच्या नाट्यकौशल्याची सशास्त्र छाननी केली नाही. स्वभावपरिपोष, संविधानरचाअीचें चातुर्य, पूर्वसूचना वगैरे जीं कालिदासाच्या नाट्यकलेचीं अंगें त्यांचा विचार करून झाला नाही. तसेंच कालिदास हा अुपमांबद्दल प्रसिद्ध. तर अुपमेचें सौंदर्य कशांत असतें याची मूलगामी चर्चा करून त्या दृष्टीने त्याच्या अुपमेची माधुरी त्यांनी नीटशी दाखविली नाही. कालिदासाच्या काव्य-नाटकांत त्यांना दोष कोठे दिसलेच नाहीत. कालिदासाच्या नाटकांत तरी स्त्रीविषयक कल्पनेंत अुदात्ततेचा अंश कमी आहे हें प्रो. मिराशी यांचें सूक्ष्म अभ्यासाने

बनलेलें मत त्यांनी पूर्वपक्ष म्हणून तरी अुल्लेखावयास पाहिजे होतें. तसेंच कालिदासाच्या नाटकांत पात्रांच्या व प्रसंगांच्या बाबतींत वैचित्र्याचा अभाव आहे. त्याच त्याच कल्पनांचा पुनरुच्चार सर्वत्रच आहे अित्यादि अनेक गोष्टी चिकित्सकपणाने काव्यविवेचनांत सांगितल्या असत्या तर त्याने कालिदासाला कमीपणा आला असता असें मानण्याची जरूरी नाही. कालिदासाच्या गुणांचें पारडें फार जड आहे, त्यामुळे अशा करण्याने नुकसान न होतां अुलट लेखकाचा आदर मात्र डोळस चिकित्सकपणाचा आहे असें ठरलें असतें. स्त्रियांच्या बाबतींत 'गृहिणी सचिवः सखी मिथः' या श्लोकावर संतुष्ट न राहतां, किंवा दिलीप सुदक्षिणेचा हात धरून तिला रथांतून अुतरवून घेतो याने स्त्रीच्या सामाजिक श्रेष्ठत्वाचें माप त्याने पुरेपूर भरलें असें मोठें समाधान न मानतां प्रो. अळतेकरांनी कालिदासाच्या काव्यनाटकांतलीं अशीं स्थळें वाचकांस सादर करावयास पाहिजे होतीं की जेथे कालिदासाच्या नायिका आपल्या नायकांना 'सचिव' या नात्याने अुपयोगी पडल्या. कवीच्या मनावर प्रायः तत्कालीन परिस्थितीचें प्रतिबिंब अुमटलेलें असतें. त्याच्यावर त्रिकालाबाधित राष्ट्रीयत्वाचा आरोप करावयाचा तर तो सावधगिरीने केला पाहिजे. नाही तर स्तुतिच निंदा ठरावयाची. असो. संशोधनाचें क्षेत्र वगळलें तरी सामाजिक व काव्यरसोद्ग्रहणाच्या बाबतींत प्रो. अळतेकरांपुढे प्रो. शिवरामपंत परांजपे, प्रो. महादेव मल्हार जोशी, चिपळोणकरशास्त्री वगैरे जुने अुत्तम अुत्तम नमुने होते. त्यांचा नुसता मागोवा घेत व त्यांत आपलेंहि कांही वैशिष्ट्य दाखवीत प्रोफेसरसाहेब गेले असते तर बहार झाली असती. ही तक्रार येथे संस्कृतज्ञ व चिकित्सक वाचकांच्या तर्फे केवळ सविनय मांडण्यांत येत आहे. यांत अुणेपणा काढण्याची बुद्धि नसून तो अेक अपेक्षाभंगामुळे मनांतून निघालेला सरळ अुद्गार आहे अेवढाच याचा अर्थ लेखकांनी कृपा करून घ्यावा.

येथवर सदर नवीन ग्रंथांत कालिदासाविषयी आजवर मान्य ग्रंथकारांनी जें लिहिलें तें लेखकांनी जमेस न धरतां सामान्य गोष्टी सांगितल्याने अपेक्षाभंग कसा झाला हें सांगितलें. आता जें त्यांनी विवेचिलें आहे त्यांतील कांही भाग सुद्धा कसा अंदाजी व वस्तुस्थितीस सोडून आहे याचीं दोनच अुदाहरणें देतों. कालिदासाच्या 'बालसृष्टीं'त कौत्स व शार्ङ्गरव या दोन प्रौढ वयाच्या—अेक चौदा विद्या पढून तयार झालेला व दुसरा कण्वांनी प्रौढ व जबाबदारी सांभाळावयास योग्य म्हणून मुलीबरोबर पाठविलेला—स्नातकांना 'अल्पवयी बालकें' गणणें म्हणजे त्यांचे पाय मोडून त्यांस पाळण्यांत घालण्यासारखें आहे! (पृष्ठ ४५ पाहा.) तसेंच पृष्ठ १९३ वरील रसास्वादाचा नमुना पाहा. 'मृदुनि मृगशरीरे पुष्पराशाविवाग्निः' यांत प्रो. अळतेकरांना 'मृदु व पुष्प' हे शब्द 'शृंगाररसाचे अुद्दीपनविभाव' वाटतात! केवळ करुणरसाच्या परिपोषणासाठीच घृणा व वधपराङ्मुखता अुत्पन्न करणाऱ्या नेमक्या याच शब्दांना प्रोफेसरांनी शृंगाररसोद्दीपक मानावें याचें सखेद आश्चर्य वाटतें. या श्लोकावरील प्रो. अ. बा. गजेंद्रगडकर यांची मार्मिक टीका व 'तूलराशाविवाग्निः' यापेक्षा 'पुष्पराशाविवाग्निः' हें पाठांतर चांगलें कां याची त्यांनी केलेली रसोद्ग्राही चर्चा लेखकांनी जरूर वाचावी. तसेंच ग्रंथांत पुनरुक्ति व पाल्हाळ दिसून येतो.

असो. अितर अनेक तऱ्हेच्या व्यासंगांत व्यग्र असतांना, व निव्वळ संस्कृतच सखोल व सशास्त्र अभ्यासाचा त्यांचा नित्याचा विषय नसतांहि प्रो. अळतेकरांनी अेवढा पावणेतीनशें पानांचा विस्तृत ग्रंथ केवळ संस्कृतच्या प्रेमाखातर लिहावा हें त्यांस निःसंशय भूषणास्पद आहे येवढें शेवटीं म्हटल्यावांचून मात्र राहवत नाही.

—के. ना. वाटवे.

# मुसलमानी अंमलांतील गोमन्तक

[लेखक: श्री. दत्तात्रेय व्यं. पै; १९३७; प्रकाशक: 'यूनियांव आकादेमिक', पणजी; पृ. ४०; किं. ६ आणे.]

प्रस्तुत छोटेखानी पुस्तक हें गोमन्तकाचे सुप्रसिद्ध साहित्यक श्री. दत्तात्रेय व्यंकटेश पै यांनी पणजी येथील 'यूनियांव आकादेमिक' (अॅकॅडेमिक यूनिअन) या संस्थेच्या विद्यमानें दिलेल्या व्याख्यानाचें मुद्रण आहे. हें व्याख्यान—'प्रबंध'—ता. १२ मार्च १९३४ रोजीं वाचण्यांत आलें व छापून २४ अेप्रिल १९३७ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आलें. हें पुस्तक विकून येणारें अुत्पन्न श्री. पै यांच्या अिच्छेने यूनियावच्या निधींत जमा व्हावयाचें आहे.

गोमन्तकाचें क्षेत्र आणि सामर्थ्य तत्कालीन हिंदु व मुसलमानी अशा ज्या प्रबल शाह्या दक्षिणेंत होअून गेल्या त्यांच्या झगड्यांत स्वातंत्र्य टिकविण्याअितपत मोठें आणि प्रभावी नव्हतें. तेथे कदमवंशाचें राज्य करीत असतांना त्याच्यावर दिल्लीच्या खिलजी सत्तेने प्रथम अल्पकालीन अधिराज्य स्थापन केलें. आणि तेथपासून विजयनगरचें हिंदु राज्य, गुलबर्ग्याचें बहामनी आणि विजापूरचें आदिलशाही हीं मुसलमानी राज्यें यांच्या रस्सीखेचींत गोमन्तकाची विलक्षण कुतरओढ झाली. इ. स. १३१८ ते पोर्तुगीजांचा अंमल १५१० त येअीपर्यंतच्या या सुमारें दोनशे वर्षांच्या काळांत झालेल्या सत्तांतरांत मुसलमानांचें अधिराज्य निदान चार वेळां तरी गोमन्तकावर आलें. परंतु या सर्व वेळा अेकत्र केल्या तरी गोमन्तकावर मुसलमानी अंमल अेकंदरींत ५६।५७ वर्षांपेक्षा आणि सातत्याने ४० वर्षांपेक्षा अधिक काल राहिला नाही असें गणित व्याख्यात्यांनी साक्षेपाने केलें आहे. रा. सावर्डेकर यांनी 'गोमंतकपरिचयां'त दिलेल्या हिशेबापेक्षा श्री. पै यांचा हिशेब आधिक काळजीपूर्वक केलेला म्हणून अधिक अचूक आहे.

त्या वेळच्या दख्खनमधील देशभाग वगळून कोकणपट्टींतील व मावळांतील बहुतेक भागांना हेंच वर्णन लागू पडण्यासारखें आहे.

त्या वेळच्या गोमन्तकाची ही विशेष परिस्थिति लक्षांत घेतां आणि खास गोमन्तकीय अितिहासावरील साधनसामग्री अद्यापि संग्रहित झालेली नाही या गोष्टीचा विचार केला म्हणजे श्री. पै यांनी अविलंबिलेली मधुमक्षिका पद्धतिच अपरिहार्य ठरते. आणि त्यांनी दक्षिणेंतील अितर राज्यांच्या अितिहासांत गुरफटलेला गोमन्तकाचा अितिहास संकलित करून अगदी थोड्या वेळांत मांडण्याचा प्रयत्न केला याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें लागतें. संकलनाचें काम करीत असतांना फार विस्तृत क्षेत्राचा परामर्श घ्यावा लागतो आणि या वेळची सर्व मदार गोमन्तकबाह्य अशा अितिहासावरच त्यांना ठेवावी लागली आहे. गोमन्तकांतीलच कागदपत्रांनी यांतील अेकेका घडामोडीवर अधिक प्रकाश पडेल त्या मानाने त्यांतील तपशील अधिक जिवंत वाटूं लागतील आणि आजच्या वृत्तांताचें जें केवळ आराखडावजा रूक्ष स्वरूप वाटतें तें अधिक मनोरंजक होईल. १९३४ नंतर तत्कालीन अितिहास-संशोधनांत थोडीशी भर पडलेली आहे विशेषतः विजयनगर स्मृतिग्रंथ जे अिंग्रजींत व मराठींत प्रसिद्ध झाले आहेत त्यावरून गोवे-विजयनगर यांच्या बाबतींत थोडा अधिक निश्चितपणा आला असल्यास नवल नाही. त्याचा अुपयोग करणें क्रमप्राप्तच आहे.

हें गोमन्तकावरील सत्तांतर आणि तें समजण्याकरिता प्राचीन गोमन्तकाचें भौगोलिक वर्णन आणि अुपदेशपर कांही सिद्धान्त यांतच पुस्तकाचा पाअूण भाग खर्च पडला असला तथापि

'मुसलमानी अंमलांत गोमन्तकीय प्रजेची व विशेषतः हिंदु प्रजेची स्थिति काय होती तें पाहणें हाच या विषयाचा मुख्य भाग होय' असा व्याख्यात्यांनी निर्वाळा दिला आहे. हा भाग वेळाच्या अभावीं त्यांना अगदी थोडक्यांत आवरावा लागला आहे. आमच्या समजुतीप्रमाणे पहिला भाग सजविण्यापुरती अितर राज्यांच्या अितिहासांत जेवढी सामग्री सापडते तेवढीहि सामग्री या दुसऱ्या भागासंबंधी सापडणें कठीण आहे. आणि जी सापडेल ती अगदी अप्रत्यक्ष आणि दूरान्वित असल्यामुळे वरचें काम केवळ अनुमानावर भागवावें लागेल.

अशा परिस्थितींत गोमन्तकासंबंधी कोणताहि विषय साकल्याने मांडतां येणें हें आज शक्य नसल्याने श्री. पै यांनी परिश्रमपूर्वक तयार केलेल्या या व्याख्यानाचें कार्य गोमन्तकीय तरुणांचें लक्ष त्या भागांतील अितिहासाच्या संशोधनाकडे वेधणें हेंच होय असें आम्ही समजतों. आणि त्या कामीं अुपलब्ध पुस्तकांचा अुपयोग अितक्या साक्षेपाने आणि कौशल्याने केल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करतों. गोमन्तकाच्या अितिहासाचा उद्धार करण्याच्या निमित्ताने यूसफ आदिलशहाने आपलें दप्तर मराठींत ठेविलें होतें अित्यादि सुप्रसिद्ध गोष्टींचा अुल्लेख करून आणि अितिहासकालांत हिंदुमुसलमानांचे संबंध कसे होते याबद्दल आजच्या परिस्थितीवरून अनुमानें काढूं नयेत हा सिद्धांत मांडून श्री. पै यांनी अितिहासाला योग्य वळण लावलें आहे हेंहि येथे नमूद करणें अवश्य आहे.

गोमन्तकाचा अितिहास पाहूं अिच्छिणाऱ्याला पोर्तुगीजांच्या आगमनानंतरचे वृत्तांत बाहुल्याने मिळतात. परंतु त्यापूर्वीचा वृत्तांत विस्ताराने लिहिलेला अुपलब्ध नाही. श्री. सावर्डेकर यांचा 'गोमंतकपरिचय' व श्री. दापाअिन व बागळे यांचा 'गोमंतकाचा प्राचीन आणि अर्वाचीन अितिहास' यांपेक्षा राणेगोंमबांब यांच्या पुस्तकांत साहजिक अधिक प्रगति झालेली आहे. श्री. पै यांनी अभ्यासाकरिता घेतलेल्या गोमन्तकांतील मुसलमानी अंमल या मर्यादित क्षेत्रांत अधिक नेमकेपणा आणला आहे आणि त्या दृष्टीने त्यांचें पुस्तक छोटें असलें तथापि संग्राह्य आहे हें वरवर पाहणाराच्याहि ध्यानांत येअील.

—दि. वि. काळे.

---

# हिंदुस्थानची नवी राज्यघटना

## ( भाग १ ला )

[ लेखक : श्री. अर्थाभ्यासी, बडोदें; पृ. सं. १००; किं. १ रु.; प्रकाशक : श्री. य. गो. जोशी, ७२३ सदाशिव पेठ, पुणें २. ]

या भागांत प्रांतिक सरकार, फेडरेशन, न्यायालयें, भारतमंत्री व त्यांचे सल्लागार, ब्रिटिश व्यापारसंरक्षक बंधनें हे विषय आले असून पुढील भागांत अैतिहासिक अुपोद्घात, प्रांतिक व फेडरल जमाखर्च, लष्करी व मुलकी नोकर, नोकरीसमित्या, फेडरल रेल्वे बोर्ड, रिझर्व्ह बँक वगैरे विषय येणार आहेत. लेखकाच्या सोयीप्रमाणे पुस्तक दोन भागांत प्रसिद्ध करणें अिष्ट झालें असलें तरी विषयाची विभागणी विवादास्पद आहे. या पुस्तकाचा विशेष हा की यांतील विवेचन क्रमिक पुस्तकाप्रमाणे निव्वळ वर्णनात्मक नाही व वर्तमानपत्री पद्धतीप्रमाणे

घांवत्या टीकेचें असें वरवरहि नाही. विषय तरं कळावा, पण टीकेचीं अंगोपांगें नीट लक्षांत यावीं अशी यांतील लेखनपद्धति आहे. अुदाहरणार्थ हिंदी लष्करासंबंधाचें (पृ. ३१।३२ वरील विवेचन) घटनाघडणीच्या वेळीं त्या विषयावर झालेल्या वादाचा मतितार्थ काढून चांगल्या रीतीने केलेलें आहे. घटनेच्या प्रत्येक अंगासंबंधी लिहितांना लेखकाला अितका विचार करतां आलेला नाही. कारण तसें केल्याने ग्रंथविस्तार फारच झाला असता. तरी आहे त्या त्रोटक विवेचनांतहि लेखकाचें बारकाअीने टीका करण्याचें सामर्थ्य व्यक्त होतें. पृ. ४७ वरील संयुक्त कायदेमंडळांतील जागांच्या वांटणीचें विवेचनहि या दृष्टीने वाचनीय आहे. कौन्सिल ऑफ स्टेटच्या सभासदांपैकीं ⅓ सभासद दर तीन वर्षांनी निवृत्त व्हावयाचे यावर टीका करतांना ग्रंथकाराने म्हटलें आहे की "या निवडणुकीच्या पद्धतीचे दोष दाखवितांना केसरीने पुढील मार्मिक अभिप्राय दिला आहे 'जसे अेकाच आगगाडीला पहिला वर्ग, दुसरा वर्ग, तिसरा वर्ग असे विविध डबे जोडलेले असतात तसेच या वरिष्ठ कायदेमंडळांत कोणी सहा वर्षांपूर्वी, कोणी तीन वर्षांपूर्वी, आणि कोणी चालू सालीं निवडलेले असे त्रिविध सभासद असावयाचे; अर्थातच कोणत्याहि प्रचलित अशा प्रश्नावर, अेकदम निवडणूक न झाल्याने, असल्या वरिष्ठ कायदेमंडळाचें मत म्हणजे आजचें लोकमत असें केव्हाच म्हणतां यावयाचें नाही" (पृ. ५०).

या आगगाडीच्या दृष्टांतांत मार्मिकपणा कोणता आहे तें लेखकासच ठाअूक ! प्रस्तुत लेखकाच्या मतें हा दृष्टांत मार्मिक नाही व वाक्यहि मूळांत तसेंच असेल तर अर्थवाहकपणा आणण्यासाठी भाषाशुद्धीच्या घाटावर बरेंच धुअून घेतलें पाहिजे !

साहित्यपत्रिकेंत परीक्षण लिहावयाचें तेव्हा भाषेबद्दल व दृष्टांतांबद्दल अेवढी चिकित्सा दाखविली तर लेखक व केसरीकार राग मानणार नाहीत अशी आम्ही आशा करतों.

—रा. वि. ओतूरकर.

---

# कीर्तनकुमुदिनी

## (द्वितीय पुष्प)

[लेखक : रा. भा. मा. उर्फ बाळासाहेब साठे; प्रकाशक : परचुरे, पुराणिक आणि मंडळी, माधवबाग, मुंबई नं. ४; किं. १। रुपया.]

बाअीचे सुविद्य अिनामदार श्रीमंत बाळासाहेब साठे यांनी नअू वर्षांपूर्वी कीर्तनकुमुदिनी या हरिकीर्तनविषयक ग्रंथाचा पहिला खंड प्रसिद्ध केला होता. त्याचाच हा दुसरा खंड आहे. कीर्तनकुमुदिनीच्या या दोनहि खंडांच्या कर्त्यांचें वैशिष्ट्य असें आहे की ते स्वतः हौसेने आपल्या वाड्यांतील गणपत्युत्सवाच्या वेळीं आपण रचलेलीं आख्यानें लावून कीर्तनें करतात; व त्यांतहि मौज ही की पूर्वरंग व आख्यानें रचीत असतां त्यांनी अेक विशिष्ट धोरण स्वीकारलें आहे. ब्रिटिशांचें आसन हिंदुस्थानांत स्थिर झाल्यापासून तों आजतागायत हिंदुस्थानांत आजपर्यंत जीं जीं महत्त्वाचीं राजकीय आंदोलनें झालीं त्यांवर त्यांनी दोनहि खंडांत मिळून चौदा आख्यानें रचिलीं आहेत. त्यांतून हिंसा, अहिंसा, सहकार, प्रतिसहकार येथपासून तों शिष्टाअी करणें व अखेरीस साम्यवाद येथपर्यंत सर्वांचें समालोचन करण्यांत आलें आहे.

आपलीं भारतादि अितिहासपुराणें यांची ठेवणच अशी आहे की मनुष्यस्वभावाच्या मूळप्रवृत्त्यनुसार जे जे लहानथोर प्रसंग उद्भवणें शक्य आहे त्या सर्वांचें वर्णन यांत ओघाओघाने आलें आहे. काळ बदलला तरी मनुष्यस्वभाव बदलत नाही. यावरुन 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' अशी आपल्याकडे यासंबंधी म्हण आहे. अितिहासाची पुनरावृत्ति होते याचा तरी अर्थ हाच. या गोष्टी मार्मिकपणें ओळखून श्रीमंत बाळासाहेब यांनी आपल्या देशांतील राजकीय परिस्थितीशीं तुल्य असे अनेक प्रसंग आपल्या अितिहासपुराणांतून निवडले आहेत. तसेंच राणा प्रतापसिंह, श्रीशिवराय यांच्या आयुष्यांतील कांही प्रसंग घेतले आहेत. आणि या सर्वांच्या साहाय्याने हिंदुस्थानची आधुनिक व राजकीय परिस्थिति ध्वनित केली आहे. हेंच बाळासाहेबांचें वैशिष्टय.

आख्यानें रचतांना आपणाला अुपयोगी अशा संस्कृत व मराठी वचनांची जी निवड करण्यांत आली आहे तीवरून बाळासाहेबांच्या बहुश्रुतपणाची व योजकतेची साक्ष पटते. उत्तर-रंगांतहि कांही श्लोक व पदें त्यांनी स्वतः रचून घातलीं आहेत. त्यांना स्वतःस संगीताचें चांगलें ज्ञान आहे, अभिनयकौशल्य आहे, वक्तृत्व आहे. या सर्व गुणांना भगवत्प्रेमरूपी सूत्रांत गोवून या चौदा रत्नांचा त्यांनी अेक हारच केला आहे. विशेषतः होतकरू कीर्तनकारांनी तो कंठांत वागविण्यासारखा आहे. तसेंच लोकसेवेच्या या काळांत खालच्या समाजापर्यंत ज्ञान नेअून पोचविण्यासहि या पुस्तकाचा अुपयोग होअील यांत शंका नाही.

—के. ना. वाटवे.

---

# व्यावहारिक ज्ञानकोश

## भाग २ रा

[प्रकाशकः ग. रं. भिडे, मॅने. डाय. व्यावहारिक ज्ञानकोश मंडळ, लिमिटेड, कोल्हापूर; किंमत १० रु.]

डॉ. केतकर व त्यांचे सहकारी यांनी महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचें प्रचंड कार्य पूर्ण केल्या-नंतर महाराष्ट्रांत शब्दकोश, चरित्रकोश, धर्मकोश, व्यायामज्ञानकोश यांसारखे मोठमोठे संदर्भ-ग्रंथ रचण्याची स्फूर्ति अुत्पन्न होअून त्यांचें कार्य झपाट्याने चालू आहे. अशाच अेका मह-त्त्वाच्या संदर्भग्रंथाचें संपादन कोल्हापूर अेथून रा. गणेश रंगो भिडे हे करीत आहेत. अिंग्रजी भाषेमध्ये अनेक विषयांवर स्वतंत्र ज्ञानकोश असून अनेक विषयांचें ज्ञान थोडक्यांत देणारेहि अनेक समुच्चयग्रंथ हरघडीं प्रसिद्ध होत आहेत. लहान मुलांपासून थोरांपर्यंत आपआपल्या ज्ञानकक्षेप्रमाणे अुपयुक्त असे संदर्भग्रंथ तिकडे अनेक तऱ्हांचे तयार होत असून त्यांचा खप हजारोंनी हिंदुस्थानांतहि होत आहे. अशाच तऱ्हेच्या अेक दोन ग्रंथांवरून व्यावहारिक ज्ञान-कोशाची कल्पना रा. भिडे यांस सुचून कांही मित्रांच्या साहाय्याने त्यांनी तीस मूर्त स्वरूप दिलें आहे. अेखादा ग्रंथकार साधनसामग्री जुळवून ग्रंथलेखन करून बसला तरी तो प्रकाशांत याव-

यास द्रव्याची आवश्यकता असतेच व तिचीच सिद्धता करणें फार कठीण असतें. रा. भिडे यांसहि या कामीं अनेक अडचणी आल्या व अनेकदा निराश व्हावें लागलें. परंतु अखेरीस कोल्हापूर दरबारनेच त्यांस मदत करून आपली गुणग्राहकता व स्थानिक कार्यास अुत्तेजन देण्याची अिष्ट प्रवृत्ति व्यक्त केली व त्यांच्या ग्रंथांस मूर्त स्वरूपांत येण्यास साहाय्य केलें हें महाराष्ट्राच्या छत्रपतींच्या परंपरेस व कीर्तीस साजेसेंच झालें असून त्यामुळे आज मराठी भाषेंत अेका अुपयुक्त व महत्त्वाच्या संदर्भग्रंथाची भर पडली आहे.

ज्ञानाचें क्षेत्र अितकें विस्तृत आहे की त्याचा कोश करावयाचा म्हटला म्हणजे कोणते विषय घ्यावे व कोणते वगळावे हा मोठा प्रश्न पडतो. तसेंच मनुष्याचा व्यवहार अनेकांगी असल्यामुळे व्यावहारिक ज्ञानकोशाचें कार्यक्षेत्र निश्चित करणें बरेंच कठिण आहे. तथापि रा. भिडे यांनी प्रारंभींच सामान्य मनुष्याच्या आयुष्यक्रमांत त्याला आवश्यक असलेली निरनिराळ्या विषयांची माहिती या ज्ञानकोशांत द्यावयाची असें आपलें क्षेत्र मर्यादित करून घेअून या आपल्या कोशाचे आतापर्यंत दोन भाग प्रसिद्ध करून त्यांत अ अक्षरापासून ज्ञ अक्षर अखेर विषयांची माहिती दिली आहे. विषयविवेचन करतांना भरपूर चित्रें व आकृति देअून लेख शक्यतों अुद्बोधक करून अंतरंग व बहिरंगाची सजावटहि चांगली केली आहे.

अशा ग्रंथांमध्ये अनेक विषयांची माहिती द्यावयाची असल्यामुळे तो अेकट्या दुकट्या माणसाकडून लिहून होणें शक्य नसतें व त्यामुळे त्यास त्या त्या विषयांच्या तज्ज्ञ माणसांचें साहाय्य घ्यावें लागतें. मराठी भाषेमध्ये निरनिराळ्या विषयांचे अभ्यासक व तज्ज्ञ गृहस्थ फारच थोडे अुपलब्ध असतात व जे असतात त्यांपैकी फारच थोड्यांस मराठी भाषेमध्ये लिहिण्याची संवय असते; अशा अडचणींतूनहि मार्ग काढून रा. भिडे यांनी अनेक विद्वान लेखकांचें साहाय्य आपल्या ग्रंथलेखनाच्या कामीं मिळविलें आहे व त्यामुळे ग्रंथांच्या अुपयुक्ततेंत भर पडली आहे यांत शंका नाही.

प्रसिद्ध झालेल्या या चारचारशें पानांच्या दोन खंडांत धर्म, समाज, कला, धंदे, व्यापार, वृक्ष, वनस्पति, कायदा, निरनिराळे पंथ, अितिहास, पुराण व अितर क्षेत्रांत प्रसिद्ध अशा व्यक्ति, स्थळें वगैरे अनेक विषयांची थोडक्यांत सामान्य वाचकांस सहज समजेल अशी मुद्देसूद व आटोपशीर माहिती दिली असून अेकंदर ग्रंथरचना चांगली झाली आहे असें म्हणावयास हरकत नाही.

आता विषयांची निवड करतांना अमुक विषयास अेवढी जागा कां दिली, अमुक विषय घेतला व अमुक वगळला, अमुक विषयाची माहिती यापेक्षा अधिक सविस्तर अगर अधिक खोल असावयास पाहिजे वगैरे तऱ्हेचे मतभेद प्रत्येक वाचकाच्या बाबतींत होणें साहजिक आहे. पण अशा प्रकारच्या ग्रंथांच्या बाबतींत नेहमी काय केलें नाही हें पाहण्यापेक्षा किती केलें आहे व तें कसें झालें आहे अेवढें पाहण्याकडेच लक्ष्य देणें अिष्ट असतें. ज्ञानाचें क्षेत्र अफाट असून त्यांत करावें तेवढें कार्य थोडेंच आहे हें आम्हीं पूर्वीच म्हटलें आहे त्याप्रमाणे अेकंदर ज्ञानाच्या क्षेत्रांत अनेकांस अनेक दृष्टींनी कार्य करतां येण्यासारखें आहे व ज्यांस तें करावयाचें आहे त्यांस अनेक ज्ञानांगें मोकळींच आहेत. प्रस्तुत केलेलें कार्य मात्र समाधानकारक आहे अेवढेंच येथें नमूद करावयाचें आहे.

तथापि कांही बाबतींत मतभेद अगर अुणीवा वाटल्या तर त्या दाखविणें हेंहि परीक्षणाचें अेक अंग असून कांही सूचना जर मार्गदर्शक होत असतील तर त्या करणें जरूर आहे. या दृष्टीने पुढील गोष्टी नमूद करीत आहें.

सदर ग्रंथांत सामान्यतः बागेंतील झाडें, औषधी वनस्पति यांची माहिती दिली आहे. परंतु अकलकरासारख्या साध्या वनस्पति सुटल्या आहेत. कांही स्थळांची माहिती दिली आहे पण अक्कलकोट, अकोला, अिचलकरंजी, कागल, कापशी अशा अगदी जवळच्या स्थळांची माहिती आढळत नाही. अहमदाबाद आहे पण अहमदनगर ही अेका महत्त्वाच्या राज्याची राजधानी असूनहि आढळत नाही. मद्रासकडील अमरावती आहे पण वऱ्हाडांतील नाही. अुलट आधेवाड, आफसर अशीं अपरिचित स्थळें आढळतात. अमेरिका, आफ्रिका वगैरे-संबंधी स्थूल माहिती तरी असावी असें वाटतें पण ती आढळत नाही. पण दुसऱ्या भागांत मात्र अितर देशांची माहिती द्यावयास सुरवात झाल्याचें दिसतें.

कांही ठिकाणीं अेकाच क्षेत्रांतील अेका विषयासंबंधी माहिती दिलेली आढळते पण त्याच क्षेत्रांतील सदृश विषयांची आढळत नाही. अुदाहरणार्थ आपोशन या विधीचें वर्णन केलें आहे पण अर्घ्य गाळलें आहे व आपोशनामध्येहि फक्त जेवणाच्या वेळच्या आपोशनाचें वर्णन आहे. वास्तविक आपोशनविधि संध्येच्या वेळीं व प्रत्येक धार्मिक विधीच्या प्रारंभीं करावयाचा असतो.

तसेंच अिंद्रियांची माहिती दिली आहे, पण अिंद्रियविज्ञानशास्त्र गाळलें आहे. आंतड्या-सारख्या शरीरावयव यांची माहिती मात्र दिली आहे. अुन्हाळें रोग दिला आहे पण अुन्हाळें म्हणजे अून पाण्याचे झरे याची माहिती नाही. बाणासुराची कन्या अुषा आहे पण वैदिक अुषा नाही. कागदाच्या फुलांची माहिती आहे पण कागदाच्या कृतीची किंवा धंद्याची किंवा आकारांची वगैरे माहिती नाही. अशोक व्यक्ति आहे पण अशोक वृक्ष नाही. कात या लेखांत कात करण्याची किंवा कातगोळ्या करण्याची कृति नाही. अर्क, अत्तरें वगैरे धंदे अथवा कलांची माहिती नाही.

कांही विषयांची माहिती मराठी वाचकांस सुलभ अशा मथळ्याखाली देणें अधिक अिष्ट झालें असतें असें वाटतें. अुदा.—कॉंट्रॅक्टच्या अैवजी करार, आर्बिट्रेशनच्या अैवजी लवाद, अेजंटच्या अैवजी अडत, अडत्या. या प्रकारची जाणीव संपादकांसहि असावी असें आर्सेनिक—सोमल पाहा, ऑक्सिजन—प्राणवायु पाहा, अिलेक्ट्रिसिटी—विद्युत् पाहा, अशा सूचना दिल्या आहेत त्यावरून दिसतें. पण आगगाडी व आगबोट यांअैवजी लोकोमोटिव्ह व स्टीमर पाहावयास सांगणें गौण आहे. आता वेळेवर विशिष्ट लेख तयार नसल्यामुळे असें स्थलांतर करणें कांही प्रसंगीं अपरिहार्य होतें ही गोष्ट अशा तऱ्हेचें संपादनकार्य करणारांस परिचित असतेच. कांही विषयांचीं स्थानांतरें भाषेच्या रूढीमुळे झालीं असण्याचा संभव आहे. अुदा.—आडुळसा—आडूसा, अफू—आफू, आठनहाण—आठणाण वगैरे.

कांही मथळ्यांवरून विषयाचा नीट बोध होत नाही. यापेक्षा अधिक अन्वर्थक मथळे दिले असते तर बरें झालें असतें. अुदा.—आपली खरी किंमत, आपली संस्कृति, कौटुंबिक शिवणकाम (हा शिवणकामांतच पोटवर्ग केला असता तर पाहणारास अधिक सोअीचें झालें असतें असें वाटतें) वगैरे.

शास्त्रीय विषय मराठींत लिहितांना अिंग्रजी पारिभाषिक शब्द तसेच ठेवल्यामुळे मराठी भाषेचें रूप कसें होअील याचा नमुना पुढील अुताऱ्यावरून दृष्टीस पडेल. "बॅटरीचें कनेक्शन आटोरेडिओस करण्यासाठी आर्म्ड केबल (धातूचें वेष्टण असलेली तार) वापरली पाहिजे. धातूचें वेष्टण Earth करावें लागतें; असें केल्याने मोटार अिंजिनच्या प्रज्वलनपद्धतीचा बाअीट

परिणाम तारेवर होत नाही. अशा तारेंत शॉर्ट होण्याची भीति कमी. नुसतीच अिन्शुलेटेड तार वापरल्यास घासून घासून वरचें अिन्शुलेशन खराब होतें व तार कोठे तरी शॉर्ट होते. ट्यूनिंग कंट्रोल (Tuning Control) (१) रेडिओ सेटवरच ठेवून रेडिओ सेट स्टिअरिंग व्हीलसमोर डॅश बोर्डाचे खालीं ठेवितात. (२) सेट् डाव्या कोपऱ्यांत डॅश बोर्डाचे खालीं ठेवून Tuning Control फ्लेक्झिबल् ड्राअीव्ह किंवा स्प्रिंग ड्राअीव्हने स्टिअरिंग व्हीलच्या दांड्यावर आणून ठेवतात. अिंजिनच्या प्रज्वलनपद्धतीमुळे (Ignition system) रेडिओ अैकतांना कड् कड् कट् कट् असे फार मोठे आवाज होअूं नयेत म्हणून आकृतीमध्ये 'अ' या ठिकाणीं दाखविल्या-प्रमाणे २५००० ते ३०००० ओहोमची विरोधकें (Resistances) प्रत्येक स्पार्किंग प्लगला व डिस्ट्रिब्यूटरवर लावतात. तशाच प्रकारचा त्रास जनरेटरपासून होअूं नये म्हणून आकृती-मध्ये 'क' या ठिकाणीं दाखविल्याप्रमाणे १ मायक्रोफॅडरचें कन्डेन्सर वापरतात. वरीलप्रमाणे व्यवस्था जर नसेल तर प्रत्येक सिलिंडरमध्ये स्पार्किंग प्लगमधून जेव्हा स्पार्क पडतो त्या प्रत्येक वेळेस लाअूड स्पीकरमधून कड् कड् असा मोठा आवाज येतो."

त्याप्रमाणेच आयुर्वेदाचें समर्थन करतांना आयुर्वेदाची बरीच ग्रंथसंपत्ति हिंदुस्थाना-बाहेर नेली गेल्याने आज अवशेष राहिलेल्या ग्रंथांचें स्वरूप पाहून आयुर्वेदशास्त्र अपूर्ण वाटत असल्यास नवल तें काय ! असा जो शेरा मारला आहे तोहि पुष्कळांस चिंत्य वाटेल.

मजकूर लिहितांनाहि थोडी फार शिथिलता आढळते तिकडे अधिक लक्ष्य दिल्यास ती सहज टाळतां येण्यासारखी आहे. अुदा. 'अेक पेलाभर भांडें ताबडतोब ओतलें असतां' (पृ. ४५). 'अिठाळ—हा अेक चपटा दगड आहे' (पृ. ११३).

कांही ठिकाणीं व्यक्तिनामें व स्थाननामें यांत नजरचुकीने चुका झाल्या आहेत त्याहि टाळतां येण्यासारख्या आहेत. अुदा. विल्यम अेडवर्ड ग्लाडस्टन, वास्तविक विल्यम अिवर्ट ग्लाडस्टन. सासबाबूचें मंदिर, ग्वाल्हेर, वास्तविक सासबहू (सासु—सून)चें मंदिर.

असो. वरील किरकोळ गोष्टी सोडून दिल्या तरी अेकंदरींत व्यावहारिक ज्ञानकोशाच्या या दोन्ही भागांवरून या सर्व ग्रंथांच्या प्रकाशनाने मराठी वाङ्मयांत सामान्य वाचकांच्या दृष्टीने अेका अुपयुक्त व महत्त्वाच्या संदर्भग्रंथाची भर पडणार आहे यांत शंका नाही. पहिल्या भागापेक्षा दुसऱ्या भागांत विशेष सुधारणा दिसून येते व अशा तऱ्हेने अेकंदर सर्व ग्रंथ लवकरच पूर्ण होतील अशी आशा आहे. यावरून अेखाद्या सामान्य गृहस्थाच्याहि चिकाटीच्या व दीर्घ प्रयत्नामुळे केवढें मोठें कार्य घडून येतें हें दिसून येतें व याकरिता प्रस्तुत कोशाची कल्पना काढून तीस मूर्त स्वरूप देणारे रा. भिडे यांचें आम्ही मनःपूर्वक अभि-नंदन करतों.

—य. रा. दाते.

# तर्कशास्त्रीय परिभाषा

## (Logical Terminology)

(प्रा. देविदास दत्तात्रेय वाडेकर, अेम्.अे., फर्ग्युसन कॉलेज, पुणें.)

[ प्रास्ताविक—माझे समव्यवसायी मित्र प्रा. वा. पु. पटवर्धन (सर परशुरामभाअू कॉलेज, पुणें) यांनी 'तर्कशास्त्र' या विषयावर मराठींत अेक विस्तृत लेख लिहिण्याचें योजून त्यासाठी त्या शास्त्रांतील ठळक अिंग्रजी पारिभाषिक शब्दांची यादी तयार केली व तींतील शब्दांस मराठी समानार्थक शब्द सुचविण्यास मला सांगितलें. या मूळ यादींतील अिंग्रजी पारिभाषिक शब्द व (अुपलब्ध साधनांचा अुपयोग करून) मीं त्यांस सुचविलेले मराठी समानार्थक शब्द असे तज्ज्ञांच्या विचारासाठी खाली शक्य तो शास्त्रांतर्गत विषयानुक्रमानें दिले आहेत. मराठी समानार्थकांपैकी क्वचित् अेकादुसरा शब्द प्रा. पटवर्धनांनी व इतर मित्रांनीहि सुचविलेला आहे.

—देविदास द. वाडेकर.]

Science of Logic = तर्कशास्त्र, अनुमानशास्त्र, तर्कविज्ञान, अनुमानविज्ञान.
Thought = विचार.
Formal = तांत्रिक.
Material = वास्तविक.
Validity = प्रामाण्य, तर्कशुद्धि.
Fallacy = हेत्वाभास, प्रामाण्याभास.
Normative Science = अस्तुवादी शास्त्र.
Positive or Natural Science = अस्तिवादी शास्त्र, सृष्टिशास्त्र.
Ought-Judgment = अस्तुसंकल्प.
Is-Judgment = अस्तिसंकल्प.
(Logical) Laws of Thought = वैचारिक अस्तुनियम, आदर्शनियम, ध्येयनियम.
Laws of Nature = सृष्टिनियम, सृष्टिविषयक अस्तिनियम.
Laws of the Land (Nation or Country) = राज्यानुशासनें.
Rules of a Game = क्रीडानुशासनें.
Ideal or Norm = ध्येय, आदर्श.
Deductive Logic = निगमनात्मक तर्कशास्त्र, निगमनन्याय.
Deduction = निगमन.
Concept = कल्पना.
Word or Name = शब्द.
Term = पद.
Common or General Term = सामान्यपद.
Singular Term = विशेषपद.
Proper Name = व्यक्तिनामपद, विशेषनामपद.
Designation = व्यक्तिदर्शक-वाचकपद.
Collective Term = समष्टिपद.
Distributive Term = व्यष्टिपद.
Abstract Term = गुणवाची पद.
Concrete Term = वस्तुपद, पदार्थपद.
Positive Term = भावपद.
Negative Term = अभावपद.
Privative Term = ऋणपद.
Contrary Term = विरुद्ध पद.
Contradictory Term = विसंगत पद.
Indeterminate Term = संदिग्ध पद.
Context = संदर्भ.
Universe of Discourse = संदर्भविश्व, प्रवचनविश्व.
Connotation or Intension = अर्थ, गुणधर्म.
Denotation or Extension = विस्तार, क्षेत्र, कक्षा.
Conventional Intension = पारंपरिक-रूढ अर्थ.
Subjective Intension = व्यक्तिगोचर गुणधर्म-अर्थ.
Objective Intension = वास्तविक गुणधर्म.
Comprehension = सर्वगुणसंघात.

Connotative Term = अर्थयुक्त पद.
Non-connotative Term = अर्थरहित पद.
Inverse Ratio = व्यस्त प्रमाण.
Absolute Term = निरपेक्ष पद.
Relative Term = सापेक्ष पद.
Ambiguous Term = संदिग्ध पद.
Unambiguous Term = असंदिग्ध पद.
Analogous Term = समानपद.
Judgment = संकल्प.
Sentence or Statement = वाक्य.
Proposition = विधान.
Subject = उद्देश्य.
Predicate = विधेय.
Copula = संयोजक.
Affirmative Proposition = भावविधान, धनविधान.
Negative Proposition = अभावविधान, ऋणविधान.
Universal Proposition = व्याप्तिविधान, सर्वगत विधान.
Particular Proposition = अंशगत विधान, एकदेशी विधान.
'A' Proposition = सर्वभावविधान (अ).
'I' Proposition = अंशभावविधान (इ).
'E' Proposition = सर्वाभावविधान (ए).
'O' Proposition = अंशाभावविधान (ओ).
Categorical Proposition = निरुपाधिक विधान.
Indicative Mood = स्वार्थ.
Imperative Mood = आज्ञार्थ.
Subjunctive Mood = विध्यर्थ.
Distributed Term = पूर्णव्याप्तपद, सर्व-व्याप्तपद.
Undistributed Term = अपूर्णव्याप्तपद, अंशव्याप्तपद.
Conditional Proposition = सोपाधिक-सांकेतिक विधान.
Hypothetical Proposition = कार्यकारण विधान; अनुलंबविधान.
Antecedent = अनुलंब्य विधान.
Consequent = अनुलंबित विधान.
Condition = उपाधि, संकेत.
Conditio sine qua non = निरपवाद उपाधि.
Disjunctive Proposition = विकल्पगर्भ विधान.
Alternatives = विकल्पविधानें.
Exclusive and Exhaustive Alternatives = परस्परव्यावर्तक व सर्वव्यापक विकल्प.
Exclusion of Alternatives = विकल्प-विधानांचें परस्परव्यावर्तन.
Exponible Proposition = सगर्भ विधान.
Exclusive Proposition = परिच्छेदक विधान.
Exceptive Proposition = अपवादी विधान.
Analytic Proposition = विकलन-क विधान.
Verbal Proposition = शब्द-शाब्दिक विधान.
Explicative Proposition = विवेचन-क विधान.
Synthetic Proposition = संकलन-क विधान.
Real Proposition = वस्तु-वास्तविक विधान.
Ampliative Proposition = विस्तार-रक विधान.
Modality of Propositions = विधान-निश्चितिविमर्श.
Modal Proposition = निश्चितिविमर्शक विधान.
Apodeictic Proposition = नियतिदर्शक विधान.
Assertorial Proposition = स्थितिदर्शक. विधान.
Problematic Proposition = संभवदर्शक विधान.
Import of Propositions = विधान-आशय-मीमांसा, विधान-अभिप्राय-मीमांसा.
Predicative or Subject-Attribute View = वस्तुगुणवाद.
Class View = वर्गसंबंधवाद, जातिसंबंधवाद.
Attributive View = गुणसंगतिवाद, गुण-साहचर्यवाद, गुणसहभाववाद.
Quantification of the Predicate = विधेयपरिमिति.
Equational Theory of Proposition = विधानविषयक समीकरणवाद.

Existential Import of Propositions= विधानांचा अस्तित्ववाचक-विषयक अभिप्राय.
Identity-in-difference = भेदाभेद, वैषम्य-युक्त साम्य.
Universal = साम्यतत्त्व.
Nominalism = नामसाधर्म्यवाद.
Conceptualism = कल्पनासाधर्म्यवाद.
Realism = वस्तुसाधर्म्यवाद.
Laws of Thought = विचारादर्शनियम.
Law of Identity = आत्मैक्यसिद्धान्त-नियम.
Law of Non-contradiction = अविसंगति सिद्धान्त-नियम.
Law of Excluded Middle = विमध्य सिद्धान्त-नियम.
Law of Sufficient Reason = युक्तप्रयोजनसिद्धान्त-नियम.
Postulate = गृहीत सिद्धान्त, पूर्वगृहीततत्त्व.
Axiom = स्वयंसिद्ध सिद्धान्त, आत्मसिद्धतत्त्व.
Reasoning or Inference = अनुमान.
Premise = पूर्वविधान, पक्षविधान.
Conclusion = अनुमितिविधान, सिद्धविधान.
Immediate Inference = अव्यवहित-संनिहित-निकट अनुमान.
Opposition of Propositions = विधानांचे परस्परसंबंध.
Contradictory Opposition = विसंगति-संबंध.
Contrary Opposition = विरोधसंबंध.
Sub-contrary Opposition = अल्पविरोध-संबंध.
Sub-altern Opposition = अनुपर्यायसंबंध.
Eduction = निष्कर्षानुमान.
Conversion = व्यत्यासक्रिया.
Converse = व्यत्यस्तविधान.
Simple Conversion = निरुपाधिक व्यत्यास.
Simply Convertible = निरूपाधिक व्यत्यासक्षम.
Conversion by limitation = सोपाधिक-परिमित व्यत्यास.
Obversion = भावविपर्ययक्रिया.
Obverse = भावविपर्यस्त विधान.
Contraposition = प्रतिविधेयोद्देशक्रिया.
Contrapositive = प्रतिविधेयोद्दिष्ट विधान.
Inversion = प्रत्युद्देशक्रिया.
Inverse = प्रत्युद्दिष्ट विधान.
Inference by Added Determinants = गुणविशेषीकरणानुमान.
Inference by Complex Conception = कल्पनासंकरानुमान.
Inference by Converse Relation = व्यत्यस्तसंबंधानुमान.
Mediate Inference = व्यवहित-असंनिहित-अनिकट अनुमान.
Syllogism = संविधानानुमान.
Major Term = ज्येष्ठ पद, साध्यपद.
Middle Term = मध्यपद, हेतुपद.
Minor Term = कनिष्ठ पद, पक्षपद.
Major Premise = ज्येष्ठ विधान, उदाहरण-विधान, व्याप्तिविधान.
Minor Premise = कनिष्ठ विधान, उपनय-विधान.
Conclusion = अनुमितिविधान.
The Dictum de Omni et Nullo = (संविधानानुस्यूत) भावाभावसूत्र.
Canons or General Rules of Syllogism = संविधानानुमानाविषयक सूत्रसिद्ध सामान्य नियम.
Special Rules = विशेषनियम.
Figures = हेतुपदस्थितिप्रकार.
Moods = विधानसंधिप्रकार.
Valid Moods = तर्कसिद्ध-प्रमाण विधानसंधिप्रकार.
Invalid Moods = तर्कासिद्ध-अप्रमाण विधान-संधिप्रकार.
Categorical Syllogism = निरूपाधिक संविधान अनुमान.
Fallacy of the Ambiguous Middle = संदिग्धमध्यपदहेत्वाभास.
Fallacy of Four Terms = चतुष्पद-हेत्वाभास, चातुष्पदिक हेत्वाभास.
Fallacy of the Undistributed Middle = अपूर्णव्याप्तमध्यपदहेत्वाभास.
Illicit Process of the Major Term = ज्येष्ठपदातिक्रम हेत्वाभास.
Illicit Process of the Minor Term = कनिष्ठपदातिक्रम हेत्वाभास.

Hypothetical Syllogism = अनुलंबसंविधान अनुमान.
Modus Ponens = विधिसंधिप्रकार.
Modus Tollens = निषेधसंधिप्रकार.
Disjunctive Syllogism = विकल्पगर्भ संविधान अनुमान.
Modus Ponendo Tollens = विधिनिषेधसंधिप्रकार.
Modus Tollendo Ponens = निषेधविधिसंधिप्रकार.
Dilemma = अनिष्टसंविधान अनुमान, शृंगसंविधान अनुमान.
Horns of a Dilemma = शृंगानुमितिविधानें.
Constructive Dilemma = विधायक शृंगानुमान.
Destructive Dilemma = विघातक शृंगानुमान.
Simple Dilemma = एकप्रमेयी शृंगानुमान.
Complex Dilemma = अनेकप्रमेयी शृंगानुमान.
Rebuttal of a Dilemma = शृंगानुमानप्रतिमंडन.
Refutal of a Dilemma = शृंगानुमानखंडन.
Reduction = स्थित्यंतर.
Direct Reduction = प्रत्यक्ष-अपरोक्ष स्थित्यंतर.
Indirect Reduction = अप्रत्यक्ष-परोक्ष स्थित्यंतर.
Compound Reasonings = मालानुमान, अनुमानश्रेणी.
Abbreviated Reasonings = संक्षिप्तानुमान.
Sorites = संक्षिप्त मालानुमान.
Progressive Sorites = प्रागतिक संक्षिप्तमालानुमान.
Regressive Sorites = परागतिक संक्षिप्तमालानुमान.
Pro-syllogism = पूर्वसंविधानानुमान.
Epi-syllogism = उत्तरसंविधानानुमान.
Poly-syllogism = अनेकसंविधानानुमान.
Epicheirema = व्यक्तहेतुसंविधानानुमान.
Enthymeme = लुप्तावयवसंविधानानुमान.
Non-Syllogistic Mediate Inference = असंविधानात्मक व्यवहित अनुमान.
Validity of a Syllogism = संविधानानुमानप्रामाण्य.
Petitio Principii or Begging the Question = साध्यग्रहण-प्रमेयग्रहण हेत्वाभास.
Enumerative and Scientific Universals = संख्यापरिमित व कार्यकारणाधिष्ठित साम्यतत्त्वें-सिद्धान्त.
Paradox of Inference = अनुमानाविषयक विरोधाभास.
Predicable = विधेयोद्देश्यसंबंधप्रकार.
Doctrine of Predicables = विधेयोद्देश्यसंबंधप्रकारमीमांसा.
Definition = व्याख्या, लक्षण.
Genus = जाति.
Species = उपजाति.
Differentia = उपजातिविशिष्टधर्म.
Proprium = गुणधर्म, उपलक्षण, अनुलक्षण, उप-अनुधर्म.
Accident = यदृच्छागुण.
Separable Accident = वियोज्य यदृच्छागुण.
Inseparable Accident = अवियोज्य यदृच्छागुण.
Summum Genus = पराजाति.
Infima Species = कनिष्ठ उपजाति.
Proximate Genus = निकटजाति.
Definition per genus et differentiam = जात्युपजातिगुणविशिष्ट व्याख्या.
Circular Definition = अन्योन्याश्रयी व्याख्या.
Negative Definition = अभावरूपी व्याख्या.
Too Wide Definition = अतिव्याप्त व्याख्या.
Too Narrow Definition = अव्याप्त व्याख्या.
Indefinables = अव्याख्येय.
Division = उपवर्गीकरण.
Fundamentum Divisionis = उपवर्गीकरणतत्त्व.
Physical Partition = विभागीकरण.
Metaphysical or Conceptual Analysis = गुणविकलन.

अनुक्रमणिका

Mutually exclusive = परस्परव्यावर्तक.
Exhaustive = सर्वव्यापक.
Gradual = क्रमशः, क्रमतः
Cross Division = उपवर्गातिक्रम, उपवर्ग-परस्परातिक्रम, उपवर्गपरस्परव्याप्ति.
Division by Dichotomy = द्वैतात्मक उपवर्गीकरण, द्वैतीकरण.
Classification = वर्गीकरण.
Co-ordinate Species = सहोपजाति.
Subordinate Species = अनूपजाति.
Artificial Classification = कृत्रिम वर्गीकरण.
Natural Classification = नैसर्गिक वर्गीकरण.
Nomenclature = नामकरण.
Terminology = परिभाषा.
Inductive Logic = विगमनात्मक तर्कशास्त्र, विगमनन्याय.
Induction = विगमन.
Presuppositions of Induction = विगमनाचीं पूर्वगृहीत तत्त्वें-गृहीत सिद्धान्त.
Perfect Induction = निखिल-समस्त-विगमन, पूर्ण विगमन.
Imperfect Induction = सद्योविगमन, अपूर्ण विगमन.
Fact or Event = घटित.
Phenomena = घटना.
Colligation of Facts = घटितसंकलन, घटितसंग्रह.
Parity of Reasoning = हेतुसाम्यविगमन.
Mathematical Induction = गणित-विगमन.
Observation = निरीक्षण.
Experiment = प्रयोग.
Mal-observation = असन्निरीक्षण.
Non-Observation = अनिरीक्षण.
Testimony = परवाक्यप्रमाण, शब्द-आप्त-वाक्यप्रमाण.
Cause = कारण.
Effect = कार्य.
Causality or Causation = कार्यकारण-संबंधसिद्धान्त.
Laws = नियम.
Laws of Causality = कार्यकारणनियम.
Generalisation = सिद्धान्त, सार-सारांश-सामान्य-तात्पर्य-सिद्धान्त-सिद्धान्तन-सिद्धान्तीकरण-नियमन-विगमन.
Empirical Generalisation = अनुभव-सिद्धान्त-सिद्धान्तन-सिद्धान्तीकरण-विगमन-नियमन.
Hypothesis = कल्पनासिद्धान्त, संकेतसिद्धान्त.
Working Hypothesis = प्रवर्तक कल्पना-सिद्धान्त.
Vera Causa = सत्य कारण.
Verification = निकषसिद्धि, पडताळा.
Crucial Instance or Experiment = निकषघटित, निकषप्रयोग, निकषनिरीक्षण.
Consilience of Inductions = संविगमन, विगमनांचा समन्वय.
Inductive Methods = विगमनप्रमाण-पद्धति.
Method of Agreement = अन्वयप्रमाण.
Method of Difference = व्यतिरेकप्रमाण.
Joint Method of Agreement and Difference = अन्वयव्यतिरेकसंयुक्तप्रमाण.
Method of Concomitant Variations = सहपरिवर्तनप्रमाण.
Method of Residues = अवशेषप्रमाण.
Method of Explanation = उपपत्ति-प्रमाण.
Direct Deductive Method = अपरोक्ष-प्रत्यक्ष निगमनप्रमाण.
Inverse Deductive Method = प्रति-निगमनप्रमाण.
Historical Method = ऐतिहासिक प्रमाण.
Comparative Method = तुलनात्मक-तौलनिक प्रमाण.
Empirical Laws = साहचर्यानुभव-विगमन-नियम.
Explanation = उपपत्ति.
Explanation by Analysis = विकलनात्मक उपपत्ति.
Explanation by Interpolation or Concatenation = प्रक्षेपात्मक उपपत्ति.
Explanation by Subsumption = उपनयात्मक उपपत्ति.
Kinds of Law = नियमप्रकार.
Axioms = स्वयंसिद्धनियम.
Postulates = गृहीतनियम.

अनुक्रमणिका

Primary Laws = मूलनियम.
Secondary Laws = उपनियम.
Derivative Laws = उपपन्ननियम.
Invariable Laws — निरपवादनियम.
Approximate Laws = बहुंशनियम.
Laws of Coexistence = सहभावनियम.
Laws of Succession = आनुपूर्व्यनियम, अनुक्रमनियम.
Analogy = उपमानानुमान, साम्यानुमान.
Equality of Ratios = प्रमाणसाम्य.
False Analogy = साम्याभास.
Probable Reasoning = संभवानुमान.
Chance = संभव.
Statistics = संख्याप्रमाण.
Averages = स्थूलप्रमाण, सरासरी प्रमाण.
Inconsistent Events = विरोधी घटितें.
Coincidence of independent events = स्वतंत्र घटनांचें यदृच्छासहवर्तन.
Fallacies = हेत्वाभास.
Pro Causa, Non Causa = कारणाभास.
Post Hoc, ergo Propter Hoc = काकतालीय हेत्वाभास-प्रामाण्याभास.
Equivocation or Ambiguity = संदिग्धार्थ.
Amphiboly = रचनासंदिग्धता.
Fallacy of Composition = समष्टिहेत्वाभास.
Fallacy of Division = व्यष्टिहेत्वाभास.
Fallacy of Accent or Emphasis = स्वरगौरव हेत्वाभास.
Ignoratio Elenchi = असंबद्ध अनुमान.
Argument in a Circle = अन्योन्याश्रयानुमान, चक्रापत्ति.
Fallacy of Many Questions = अनेकप्रश्नहेत्वाभास.
Reductio ad Absurdum = अनिष्टापत्ति.

---

# वाङ्मयवार्ता

| | |
|---|---|
| विजयादशमी | काव्यरत्नावलीकार, श्री. फडणीस यांचा जळगांव येथे मृत्यु. |
| १० नो. १९३७ | ग्वाल्हेर दरबारतर्फे श्री. भास्करराव तांबे यांस 'राजकवि' ही पदवी व दरमहा १०० रु. तैनात देऊन सन्मान. |
| २०।२१ नो. १९३७ | पुरोगामी लेखक परिषद्, मुंबई. अध्यक्ष श्री. पु. ह. पटवर्धन; स्वागताध्यक्ष श्री. भा. वि. वरेरकर. |
| १४ डि. १९३७ | विश्वविद्यालयीन पदवीदान समारंभात मातृभाषेंत भाषण करण्याचा प्रथम उपक्रम अलाहाबाद विश्वविद्यालयांत पंडित मदनमोहन मालवीय यांनी केला. |
| २० डि. १९३७ | अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद् त्रिवेंद्रम्; अध्यक्ष डॉ. फ्रॅ. वि. टीमस. |
| १५ जा. १९३८ | सुविख्यात वंग साहित्यिक डॉ. शरश्चंद्र चतर्जी यांचें निधन. |
| २२ जा. १९३८ | बडोदें वाङ्मय परिषद्; सहावें अधिवेशन. अध्यक्ष श्री. वि. दा. सावरकर; स्वागताध्यक्ष राजरत्न वा. वि. जोशी. |

---

# राष्ट्रभाषा व राष्ट्रलिपी*

आता संमेलनाचें अुद्‌घाटन करतांना आपल्या प्रांताचे प्रधान ना. डॉ. खरे यांनी जें हिंदीसंबंधी सांगितलें तें अत्यंत अुचित आहे. आपण प्रथम भारतीय आहों व नंतर महाराष्ट्रीय आहों. नर्मदा व कृष्णा या नद्यांनी परिवेष्टित येवढाच केवळ महाराष्ट्र न मानतां पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत आणि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेला सबंध भारत हा महाराष्ट्रच मानण्याला आपण शिकलें पाहिजे. अर्थात् त्या दृष्टीने हिंदी ही राष्ट्राची अेक राष्ट्रीय भाषा होणें हें केवळ अुचितच नाही तर आवश्यकहि आहे. पूर्वकालीं जरी संस्कृत हीच देशाची अेकमेव भाषा होती व सर्वदेशीय महत्त्वाचे असे ग्रंथ व काव्यें जरी संस्कृतामधून लिहिलीं जात तरी पुढे कालांतराने तिची जागा हिंदीने पटकाविली. मराठी संतकवि नामदेवाने हिंदी भाषेंत रचना केली असून ती आजहि पंजाबसारख्या दूरच्या विभागांत प्रसिद्ध आहे व तुकारामाचे कांही अभंगहि हिंदींत आहेत. यावरून हिंदी ही त्या काळांत सर्वराष्ट्रीय भाषा कशी होअून बसली होती तें बरोबर दिसून येअील. या प्राकृत भाषेचा प्रचार चारी धामांच्या यात्रा करणाऱ्या साधुवैराग्यांच्यामुळे वाढल्यामुळे तिला साधूंची किंवा वैराग्यांची भाषा असें अभिधान त्या काळीं प्राप्त झालें होतें. धर्माने मुसलमान असलेल्या कवींनीहि आपली काव्यरचना त्या काळीं व्रज भाषेंतून केली आहे.

अर्थात् पंडितांची भाषा मात्र संस्कृत हीच राहिली. अर्थात् संस्कृत भाषेचा सामान्य जनांतून लोप होअून हिंदीचा प्रादुर्भाव होण्याला आपल्यावर परकीयांचीं आक्रमणें हीं जशीं कारण झालीं तसें आपलें शैथिल्याहि त्याला बऱ्याच अंशाने कारण झालें. तें कसेंहि असलें तरी अेवढी गोष्ट खरी की हिंदी ही राष्ट्रभाषा मानण्याची कल्पना नवी असली तरी तिचा प्रचार मात्र नवीन नाही. तिने पूर्वीपासूनच राष्ट्रभाषेचें स्थान पटकाविलेलें आहे. यांत पुढे इंग्रजी राजवट सुरू झाल्यापासून खंड पडला. पण हा फरक नवीन अिंग्रजी शिक्षणाने अलंकृत झालेल्या म्हणजे वरच्या वर्गांतच मुख्यतः पडला. आता हिंदी हीच आपली राष्ट्रभाषा व तिचा अधिकाअधिक प्रचार होणें अवश्य आहे, ही गोष्ट ठरली. परंतु अलिकडे हिंदीचें जें भ्रष्टीकरण सुरू झालें आहे त्यामुळे राष्ट्रभाषा हिंदी हिचें स्वरूप कसें असावें यासंबंधी वाद अुपस्थित झाला.

'हिंदी याने हिंदुस्थानी' हें नवें नांव तिला मिळूं पाहत आहे. अुर्दू, पारशी वगैरे जे शब्द मूळच्या संस्कृतनिष्ठ हिंदींत शिरले ते तसेच कायम राहूं देअून जी भाषेची खिचडी होअील ती राष्ट्रभाषा मानावी असें मानण्याकडे सध्या या देशांतील कांही बऱ्या लोकांचा कल आहे. परंतु ही गोष्ट मात्र अनुचित आहे. राष्ट्रभाषा तीच होअूं शकते कीं जी समन्वित राहील. आपला अितिहास आणि परंपरा यांत बसणारी ही भाषा नाही. शिवाय नवशब्दप्रसवाला जी भाषा समर्थ आहे तीच भाषा हिंदीची जननी असणें योग्य आहे. नव्या

* महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मध्यप्रान्त शाखेचें पहिलें संमेलन डिसेंबर ११-१२, १९३७ ला नागपूर येथे बॅ. विनायकराव सावरकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यांत आलें त्या वेळीं सावरकरांनी केलेल्या समयस्फूर्त भाषणाचा गोषवारा.

युगांत उद्भवणाऱ्या अभिनव कल्पना व वस्तु यांचे निदर्शक अशी शब्दांचा पुरवठा करूं शकेल अशी भाषा संस्कृतशिवाय आज जगांत दुसरी कोणती आहे ? अरेबिक भाषा व लिपि या दोन्हीहि या कामीं असमर्थ आहेत. अरेबिक लिपि तर या कामीं अितकी निकृष्ट आहे की तुर्कस्थानांतून तिचें उच्चाटन करून तेथे रोमन लिपि केमालपाशाला प्रचारांत आणावी लागली. देवनागरीअितकी पूर्णतेस पोंचलेली लिपि व संस्कृतअितकी नवशब्दप्रसवक्षम भाषा जगांत दुसरी नाही.

काव्य, शास्त्र, विज्ञान या सर्वांना शब्दांच्या राशी पुरवूं शकेल अशी संस्कृत ही अेकच भाषा आहे. ग्रीक व लॅटिन याहि या कामीं अपुऱ्या आहेत. निझाम सरकारने आपल्या ओस्मानिया विद्यापीठांत अुर्दू भाषा या कामीं लावण्याचा प्रयोग करून पाहिला होता; पण तो असफल ठरल्यामुळे तो नाद त्यांना शेवटीं सोडून द्यावा लागला. शेवटीं नाअिलाजाने त्यांना अिंग्रजी शब्दच जसेच्या तसे अुचलावे लागले. मग आता हा प्रयोग आपण करून पाहण्यांत काय अर्थ ? आणि हें करावयाचें तरी कशासाठी ? तर मुसलमानांना खूष करण्यासाठी ! परंतु याने तरी ते प्रसन्न होतात का ?

आता तर त्यांनी अुर्दू हीच राष्ट्रभाषा व अरेबिक हीच लिपि हिंदुस्थानांत नांदली पाहिजे अशी घोषणा केली आहे. मग तुमच्या त्या त्यागाला काय फळ आलें ? तुम्ही जसं-जसें पाअूल मागें घ्याल तसतसें त्यांच्या दुराग्रहाचें अेकेक पाअूल पुढे पुढेच पडत जाणार हें दिसतच आहे. कलकत्ता विद्यापीठाचें प्रतीक श्रीयुक्त कमल हें त्यांच्या डोळ्यांना आता सलूं लागलें असून वंदेमातरम् हें आजवर सर्वमान्य झालेलें राष्ट्रगीत त्यांना अैकवेनासें झालें आहे. डाक्का विद्यापीठांत क्रमिक पुस्तकांतून बंगाली शब्दांचें अुच्चाटण करून अुर्दू शब्द तिथे घुसडण्याची कारवाअी सध्या चाललेली आहे. अेका पुस्तकांत बंगाली शब्द किती असावेत व अुर्दू किती असावेत याची जणू काय वांटणी करून घेण्याचा प्रयत्न त्यांनी चालविला आहे. विधिमंडळांतील जागांच्या वांटणीचें प्रमाण भाषेंतहि शिरलें तर कसा अनवस्था प्रसंग अुद्भवेल याचा आपण विचार करा. पण ही त्यांची भूक तुमची भाषा सबंध गिळून टाकल्याखेरीज थांबणार नाही. सरहद्दप्रांतांत हिंदी व गुरुमुखी यांची चाललेली गळचेपी ही मुसलमानांच्या अेतद्विषयक वृत्तीचें अुत्तम प्रत्यंतर आहे. अर्थात् त्यांच्या या हट्टापुढे सदाच मान वाकवीत राहूनहि त्यांचें कधी तरी समाधान होअील का ? अर्थात् नाही हें अुघड आहे.

मग त्यांची पत्राज कुठपर्यंत करायची ? आता गुळमुळीत भाषा वापरून निभत नाही. अेकदा हें स्पष्टपणे हिंदूंनी सांगून टाकलें पाहिजे की या देशाची राष्ट्रभाषा अुर्दू नाही, अुर्दू-मिश्र हिंदी म्हणजेच हिंदी याने हिंदुस्थानी नव्हे. तर संस्कृतनिष्ठ हिंदी हीच राहील. गुळ-मुळीत भाषेनेच आजवर आपला घात करून अितरांच्या आक्रमक वृत्तीला जीवन पुरविलें आहे. अर्थात् यापुढे आपण आपल्या राष्ट्रभाषेचें भ्रष्टीकरण सहन करतां अुपयोगी नाही. अहो, हिंदी याने हिंदुस्थानी या नव्या भाषेच्या नांवांतहि संस्कृत व अरबीचें मिश्रण आहे ! अुर्दू ही वस्तुतः बाजारी भाषा आहे. कायरोसारख्या शहरांत देशोदेशींच्या प्रवाशांच्या सर-मिसळीपासून व त्यांच्याशीं व्यवहार करण्याच्या स्थानिक लोकांच्या गरजेंतून तेथे अेक वेगळीच भाषा अुत्पन्न झाली. अुर्दू ही असलीच भाषा आहे.

पण बाजारांतील भाषा हीच राष्ट्रभाषा झाली पाहिजे असाच तर आज कित्येकांचा आग्रह आहे ! परंतु ते ही गोष्ट विसरतात की, यामुळे नवशब्दप्रसवक्षमतेच्या दृष्टीने व श्रुति-

मंजुळतेच्या दृष्टीने आपल्या राष्ट्रभाषेची अपरिमित हानि होणार आहे. आणि या दोन्ही गोष्टी भाषा सामर्थ्यशाली होण्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहेत. अशी भाषा या देशांत अेक संस्कृतनिष्ट हिंदी हीच होअू शकते. आणि म्हणून आपण अेकदा अितरांना हें स्पष्टपणें सांगून टाकिलें पाहिजे की, तुम्ही सुखेनैव आपली अुर्दू भाषा स्वतःपुरती ठेवा; पण आम्ही आपल्यावर तिचा जुलूम चालूं देणार नाही. नाही तरी देवनागरीबरोबरच अुर्दू लिपीहि दुसरी राष्ट्रीय लिपी म्हणून मान्य केलीच ना! मुसलमानांच्या हट्टासाठी जर कांही करणें आवश्यकच असेल तर लिपीप्रमाणेच त्यांच्यापुरती अुर्दू भाषाहि मान्य करा; परंतु हिंदींवर तिला कुरघोडी करूं देअूं नका. त्याने अैक्यहि साधणार नाही व भाषेचा गौरवहि वाढणार नाही. हें तुम्हीं अेकदा केलेंत म्हणजे अुद्या असा प्रसंग आपोआपच येअील की, तुमची हिंदी भाषा हीच त्यांना शिकावी लागेल. कारण आपण बहुसंख्य आहोंत व आपल्याशीं व्यवहार करावयाचा तर आपली भाषा शिकणें त्यांना प्राप्तच आहे. तुम्हीं मात्र आपलें दौर्बल्य सोडून दिलें पाहिजे. या मार्गाने तडजोडीच्या प्रयत्नांवांचूनच आपोआप तडजोड घडून येअील.

मुसलमानांच्या रागालोभाची पर्वा करण्यापायीं अितिहास विकृत करण्यापर्यंत आपली मजल गेली आहे. आमच्या बाजूचीं कांही क्रमिक पुस्तकें माझ्या सहजगत्या अवलोकनांत आलीं. त्यांत देवगिरीच्या यादवांचें राज्य मुसलमानांनी घेतल्याचें व त्या वेळीं हरपाळदेवाला कैद केल्याचें लिहून पुढे हिंदु-मुस्लिम अैक्याचे गोडवे गायिले आहेत. या अैक्याचा पुरस्कार करून मुलांचीं मनें पवित्र राखावी हें युक्तच आहे. परंतु अितिहास त्यांना पूर्णपणें कां निवेदीत नाही! त्या हरपाळदेवाचें कातडें जिवंतपणीं आपादमस्तक सोलून काढण्यांत आलें हें त्यांजपासून कां लपवून ठेवतां! संभाजीला नुसती अटक केली असेंहि मीं अेका क्रमिक पुस्तकांत वाचलें! हा ढोंगीपणा कां! त्याचे हाल हाल करून मारण्यांत आलें आणि शीर अेका ठिकाणीं व धड दुसऱ्या ठिकाणीं बारा मैलांच्या अंतराने अुंटावरून लोटून देण्यांत आलें हें त्यांना कां निवेदित नाही! तर ज्यांनी हे अनन्वित प्रकार केले त्यांना राग येतो म्हणून!! यापेक्षा निर्लज्जपणा कोणता हवा! आता राष्ट्रीय सभेची राजवट बहुसंख्य प्रांतांतून सुरू झाली आहे; तेव्हा ही चूक सुधारतां येणें शक्य आहे व अवश्यहि आहे. आपल्या प्रांताचे प्रधान डॉ. खरे यांनी या गोष्टीकडे अवश्य लक्ष द्यावें अशी माझी त्यांना सूचना आहे.

## लिपिसुधारणा

प्रारंभीं जगांत हातवारे व नेत्रसंकेत यांनी भावनांचें प्रगटीकरण पूर्णपणें होत नाही असा प्रत्यय आल्यामुळे जसा बोलीभाषेचा जन्म झाला, तशीच विचारांचा संग्रह करून ठेवण्याची आवश्यकता अुत्पन्न झाल्यामुळे लिपि जन्मास आली. जगांतील प्राचीन काळांतील प्रगत राष्ट्रांत चित्रलिपि प्रचलित होती व आजहि चीन, जपान वगैरे देशांत ती प्रचलित आहे. परंतु तिजमुळे अक्षरसंख्या अितकी वाढली की तिच्यांत सुधारणा करण्याची आवश्यकता अुत्पन्न झाली. यांतूनच ब्राह्मी म्हणजे देवनागरी लिपीचा जन्म झाला. ही लिपी ज्या क्षणीं जन्मास आली तो मोठा युगप्रवर्तक क्षण समजला पाहिजे. ही लिपी अितकी विचारपूर्वक बसविली आहे व तिची रचना अितकी शास्त्रीय आहे की तिच्याशीं जगांतील कोणतीहि विद्यमान लिपि स्पर्धा करूं शकत नाही.

अेका अुचाराला अेक अक्षर हें तिचें वैशिष्ट्य आहे. परंतु अितकी शास्त्रबद्ध अशी जरी आपली लिपि असली तरी मुद्रणसौकर्याच्या दृष्टीने तींत कांही फेरफार करणें आज

आवश्यक झालें आहे. अिंग्रजी भाषेशीं मुद्रणाच्या बाबतींत तोंड द्यावयाचें असेल तर तींत सुधारणा अनिवार्य आहे. देवनागरी लिपि सुटसुटीत व कमी अक्षरांची करणें हाच त्यावर अुपाय आहे. या दृष्टीने माझ्या पद्धतीने जर देवनागरी लिपि लिहिण्यांत आली तर 'अ'च्या बाराखडींतील ८ अक्षरें, सुमारें १०० जोडाक्षरें व २५ 'र'काराचे प्रकार अितकीं अक्षरें वाचून सुमारें ५६ खणांत मराठी जुळाऱ्याची पेटिका पूर्ण होअूं शकते. सध्याचीं जोडाक्षरें लिहिण्याची पद्धति ही कांही सर्वांशी पूर्वापार नाही. त्यांत निरनिराळ्या काळीं आवश्यकते-नुसार फरक पडलेला आहेच. मग आज मुद्रणसौकर्याच्या दृष्टीने आपण आणखी सुधारणा करावयाला काय हरकत आहे!

या सुधारणांपैकी कित्येक तर प्राचीनांचें पुनरुज्जीवनच आहेत. शिवाय ही नवी लिपि मुलांना समजण्यास सोपी आहे. सौंदर्याच्या दृष्टीने या सुधारणेमुळे लिपीची हानि होते हें म्हणणेंहि बरोबर नाही. हा फक्त दृष्टीला लागलेल्या संवअीचा परिणाम आहे. वृत्तपत्रकारांनी व शिक्षणमंत्र्यांनी जर ही गोष्ट मनावर घेतली तर देवनागरीहि लौकरच अेक चांगली मुद्रणक्षम लिपी बनेल. 'अ'ची बाराखडी तर आता प्रचारांत येअूं लागलीच आहे. परंतु माझ्याच साऱ्या सूचना स्वीकारा असाहि माझा आग्रह नाही. अितरांनी वाटल्यास आपल्या सूचना पुढे मांडाव्या व तज्ज्ञांनी सर्वांचा विचार करून ही सुधारणा घडवून आणावी.

---

## म. सा. परिषदेच्या मध्यप्रांत शाखेचें संमेलन
## नागपुरांतील त्रिवेणी संगम

(चिटणीसांकडून)

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नागपूर शाखेतर्फे मराठी मध्यप्रांतीय साहित्यसंमेलनाचें अधिवेशन पूर्वसंकल्पानुसार रविवारीं व सोमवारीं मिळून पार पडलें. अध्यक्षस्थानीं स्वातंत्र्य-शाहीर बॅ. सावरकर यांची योजना करण्यांत आली होती. रविवारीं ता. ११-१२-३७ सकाळीं ८ वाजतां विद्यापीठाच्या पदवीदानमंदिरांत या संमेलनास प्रारंभ झाला. प्रारंभीं मुलींनी राष्ट्रगीत वंदेमातरम् व सावरकरांच्या स्वागतपर पद्य म्हटल्यावर शाखाध्यक्ष प्रो. ना. के. बेहेरे यांनी स्वागतपर भाषण केलें. ते म्हणाले, "सावरकरांसारख्या स्वातंत्र्य-सिंहाच्या अध्यक्षतेखाली हें संमेलन भरण्याचा योग येत आहे हें आपलें महत्भाग्य होय. विशेष अुल्लेखनीय गोष्ट ही की ज्या सावरकरांच्या वाऱ्यासहि उभें राहणें ही पूर्वी सामान्य लोकांना देखील ब्रह्महत्या वाटावी त्याच सावरकरांच्या अध्यक्षतेखाली भरणाऱ्या साहित्य संमेलनाचें उद्घाटन प्रांताच्या मुख्य प्रधानांच्या हस्तें आज होत आहे. काळाने अुगविलेला हा सूड आहे. महाराष्ट्र साहित्यपरिषद् म्हणजे महाराष्ट्राच्या पांच तुकड्यांचें अेकत्रीकरण करणारा धागा आहे. वऱ्हाड, मध्यप्रांत, मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र, निझाम संस्थानांतील मराठी मुलूख व गोमंतक या महाराष्ट्राच्या पांचहि तुकड्यांना भाषेचें बंधन हें सामान्य आहे."

अशा आशयाचें त्यांचें भाषण झाल्यावर अध्यक्ष, ना. डॉ. खरे, नवे कुलगुरु श्री. केदार, ना. रामराव देशमुख, सौ. काळे प्रभृति प्रमुख पाहुण्यांना पुष्पहार घालण्यांत आल्यावर शाखाध्यक्षांच्या विनंतीवरून ना. डॉ. खरे यांनी संमेलनाचें अुद्घाटन केलें. आपल्या लेखी भाषणांत त्यांनी साहित्याच्या प्रांगणांत तरी जातीय, प्रादेशिक विभागांची वा राजकीय मतभेदाचीं भांडणें न आणतां सरस्वतीची पूजा सर्वांनी मिळून करण्याची आवश्यकता प्रतिपादिली व हिंदी ही राष्ट्रभाषा होणार असल्यामुळे त्या हेतुसिद्धयर्थ झटण्याची विनंती केली. परंतु त्याबरोबरच मराठीचें उच्चाटण करून त्या जागीं हिंदीची प्रतिष्ठापना केली जाणार आहे अशी भ्रामक समजूत करून घेअू नका, असेंहि स्पष्टीकरण केलें.

त्यानंतर लो. ना. अणे, वा. म. जोशी, धुळ्याचे शंकरराव देव, जळगांवचे कवि तिवारी, हैदराबादचे बॅ. नाईक, नाशीकचे प्रो. पाटणकर व श्री. देवदत्तपंत टिळक प्रभृतींकडून संमेलनास आलेले शुभचिंतनपर संदेश प्रा. वि. घ. देशपांडे यांनी वाचून दाखविले. यानंतर बॅ. सावरकर यांचें दीड तासपर्यंत अत्यंत उद्बोधक व परिणामकारक असें भाषण झालें. त्यांनी आपल्या भाषणांत मुख्यतः तीन गोष्टींचा अूहापोह केला. राष्ट्रभाषा हिंदी ही संस्कृतनिष्ठ असावी, क्रमिक पुस्तकांतील धड्यांत अैतिहासिक सत्याचा जो अपलाप करण्यांत येतो तो बंद व्हावा, व लिपिसुधारणा—या त्या तीन बाबी होत. लिपिसुधारणेचा विषय त्यांनी फळ्याच्या साहाय्याने श्रोतृवर्गाला स्पष्ट समजावून दिला हें विशेष होय.

त्यानंतर दुपारीं ठरावांवर चर्चा होअून सोमवारीं रात्रीं ९॥ वाजतां काव्यगायनाचा कार्यक्रम झाला. या प्रसंगीं प्रो. बेहेरे यांनी मध्यप्रांत शाखेतर्फे १०१ रु. ची थैली बॅ. सावरकरांना अर्पण केली, व त्यांचें 'संन्यस्त खड्ग' हें नाटक बी. ए.च्या परीक्षेला लावण्यांत आल्याचें सांगितलें. संमेलनाचें स्थल युनिव्हर्सिटीचें पदवीदानमंदिर, उद्घाटन करणारे प्रांताचे मुख्य प्रधान ना. डॉ. खरे व अध्यक्ष देशभक्त बॅ. सावरकर, असा गोड त्रिवेणीसंगम घडल्यावर संमेलन अत्यंत यशस्वी कां बरें होणार नाही !

## ठराव

संमेलनांत मंजूर झालेले ठराव पुढे दिले आहेत.

(१) कॉंग्रेसने मान्य केलेलें भाषावर प्रांतरचनेचें तत्त्व या संम्मेलनास पूर्णपणें सम्मत आहे आणि त्या तत्त्वास अनुसरून महाराष्ट्राच्या अेकीकरणाची जी जी चळवळ होअील तिला या शाखेतर्फे सक्रिय पाठिंबा देण्यांत येअील.

ठराव मांडणारः—श्री. पु. य. देशपांडे. दुजोरा देणारः—श्री. मो. शा. शहाणे.

(२) हिंदी ही हिंदुस्थानाची राष्ट्रभाषा मानली जावी आणि देवनागरी ही अेकमेव राष्ट्रलिपी समजण्यांत यावी.

ठ. मांडणारः—श्री. भाअी कल्याण. दु. देणारः—श्री. के. व्ही. फणसे.

(३) वऱ्हाड व मध्यप्रांतांतील मराठी भाषा बोलणाऱ्या जिल्ह्यांतून शिक्षणाचें माध्यम मराठी असावें व तेथील सरकारी दप्तरें शक्य तोंवर मराठी भाषेंत ठेविलीं जावींत.

ठ. मांडणारः—श्री. बा. सं. गडकरी. दु. देणारः—श्री. वि. घ. देशपांडे.

(४) मुलताअी, संसर व बऱ्हाणपूर या तालुक्यांत मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांची बरीच मोठी संख्या असूनहि तेथे स्थानिक स्वराज्यसंस्थांकडून मराठी शिक्षणाच्या प्राथमिक

शाळा अुघडण्याची टाळाटाळ केली जाते याबद्दल या सम्मेलनास खेद होत आहे व अशा सीमान्त प्रदेशांत राहणाऱ्या लोकांच्या प्राथमिक शिक्षणाची सोय त्यांच्या मातृभाषेंतून करण्यांत यावी अशी जोराची शिफारस हें सम्मेलन करीत आहे.

ठ. मांडणारः—श्री. वि. घ. देशपांडे. दु. देणारः—श्री. श. वा. रानडे.

(५) मोडी लिपी ही महाराष्ट्राची प्राचीन, अैतिहासिक व लेखनास सुलभ व सोपी अशी लिपी आहे. प्राथमिक व मध्यम कक्षेच्या शाळांत ही लिपी अवश्य विषय म्हणून शिकविण्यांत यावी. त्याचप्रमाणे नॉर्मल स्कूलमधील विद्यार्थी शिक्षकांची व पटवाऱ्यांची या लिपींत परीक्षा घेण्यांत यावी.

ठ. मांडणारः—श्री. एम्. जी. देशमुख. दु. देणारः—श्री. एम्. जी. दीक्षित.

(६) या प्रांतांतील मराठी भाषा बोलणारा भंडारा हा अेकच जिल्हा हिंदी विभागांत समाविष्ट करण्यांत आल्यामुळे तेथील लोकांची फार गैरसोय झाली आहे. तेव्हा तो पूर्वीप्रमाणे नागपूर विभागास जोडण्यांत यावा. (अध्यक्षांकडून)

(७) सुप्रसिद्ध मराठी कवि व साहित्यिक श्री. ज. के. अुपाध्ये यांच्या अकाली मृत्यूने मराठी वाङ्मयाचें फार मोठें नुकसान झालें त्याबद्दल या संमेलनास अतिशय दुःख होत आहे. (अध्यक्षांकडून)

(८) भाषावार विद्यापीठें स्थापन करण्याचें तत्त्व या संमेलनास मान्य असल्यामुळे महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेला या संमेलनाचा पूर्ण पाठिंबा आहे. (अध्यक्षांकडून)

(९) पूर्वीच्या राजवटींत जप्त झालेल्या वाङ्मयावरील बंदी अंशतः अुठविल्याबद्दल हें सम्मेलन कॉंग्रेसच्या प्रधानमंडळाचें, विशेषतः मध्यप्रांताचे प्रधानमंत्री ना. डॉ. खरे यांचें, मनःपूर्वक अभिनंदन करते व राहिलेल्या सर्व पुस्तकांवरील बंदी शक्य तितक्या लवकर अुठवावी अशी यांना विनंती करतें. (अध्यक्षांकडून)

(१०) मातृभाषेखेरीज दुसरी कोणतीहि भाषा शिक्षणक्रमांत अवश्य विषय म्हणून समाविष्ट करण्यांत येअूं नये असें या सम्मेलनाचें मत आहे.

ठ. मांडणारः—श्री. पु. य. देशपांडे दु. देणारः—श्री. बा. सं. गडकरी.

या ठरावांतलि 'शिक्षणक्रमांत' या शब्दापूर्वी 'प्राथमिक' हा शब्द घालण्यांत यावा अशी अुपसूचना प्रो. मिराशी यानी मांडली. तीवर बरीच चर्चा होअून शेवटीं मूळ ठराव प्रचंड बहुमताने पास झाला.

(११) या प्रांतांतील प्रत्येक सरकारी नोकराला हिंदी व मराठी भाषांचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे असें या संमेलनाचें मत आहे आणि सरकारमार्फत ज्या ज्या डिपार्टमेंटल परीक्षा घेण्यांत येतात त्यांपैकी मराठीपुरती परीक्षा साहित्यपरिषदेमार्फत घेण्यांत यावी अशी या सम्मेलनाची मध्यप्रांत सरकारला सूचना आहे.

ठ. मांडणारः—श्री. वि. मा. अत्रे. दु. देणारः—श्री. अ. रा. देशपांडे.

# मुंबअी अिलाख्यांतील ग्रंथप्रकाशन



मुंबअी सरकारच्या सर्वसाधारण राज्यकारभाराच्या वार्षिक अहवालांत या अिलाख्यांतील ग्रंथप्रकाशनाच्या प्रगतीचे आंकडे दरवर्षी प्रसिद्ध केले जातात. यंदा या ग्रंथप्रकाशनाच्या अहवालाबद्दल मुंबअी सरकारच्या प्रसिद्धिखात्याने अेक स्वतंत्र पत्रक काढून त्या द्वारें ही माहिती अधिक लोकांना कळावी अशी व्यवस्था केली आहे. या पत्रकावरून असें दिसून येतें की १९३४-३५ साठी मुंबअी अिलाख्यांत जेवढी ग्रंथनिर्मिति व ग्रंथप्रकाशन झालें होतें त्यापेक्षा ती १९३५-३६ सालीं ४०० ने वाढली. १९३५-३६ सालीं मुंबअी अिलाख्यांत अेकंदर ३४४० पुस्तकें प्रकाशित केलीं गेलीं. यांत नियतकालिकांचाहि समावेश करण्यांत येत असल्यामुळे, खरी टिकाअू ग्रंथसंपत्ति किती निर्माण झाली व तात्कालिक स्वरूपाची किती झाली हें कळण्यास ह्या पत्रकाचें साधन अुपयोगी पडणार आहे. या अहवालांत (१) तात्कालिक स्वरूपाची व (२) चिरकालीन स्वरूपाची अशी ग्रंथनिर्मितीची विभागणी करून, त्यासंबंधाचे भाषावार आंकडे सरकाराने प्रसिद्ध केले आहेत. या ३४४० प्रकाशनांत ३३७० नवे ग्रंथ, २० पुनर्मुद्रितें व ५० भाषांतरित ग्रंथ असून, भाषावर दृष्टीने ग्रंथनिर्मितीची संख्या पुढीलप्रमाणे होती.—

| | |
|---|---|
| देशी भाषा | २५३४ |
| इंग्रजी | ४४१ |
| पुराणभाषा | ५० |
| बहुभाषात्मक | ४१५ |

देशी भाषांतील ग्रंथनिर्मितीची बरोबर कल्पना पुढील कोष्टकावरून येअील:—

| भाषा | ग्रंथ | नियतकालिकें |
|---|---|---|
| मराठी | ६६४ | ४१३ |
| गुजराती | ६२४ | ६०२ |
| आंग्ल | २३४ | २०७ |
| कानडी | ९८ | २ |
| हिंदी | ४० | ४६ |
| अुर्दू | २३ | १५ |
| पुराणभाषा | ४९ | १ |
| प्रादेशिक उपभाषा | ७ | ० |
| बहुभाषात्मक | २७९ | १३६ |
| | २०१८ | १४२२ |

अनुक्रमणिका

या आंकड्यांवरून असें दिसून येतें की मुंबअी अिलाख्यांत ग्रंथनिर्मितीच्या बाबतींत मराठी भाषेला अग्रेसरत्वाचा मान आहे. कोकणी वगैरे प्रादेशिक भाषांतहि सात ग्रंथ निर्माण झाले आहेत. या अिलाख्यांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचें भाषेकडे न पाहतां नुसतें विषयवार वर्गीकरण सरकारी अहवालांत केलेलें आहे. तें विषयवार वर्गीकरण असें आहेः—

| विषय | ग्रंथसंख्या |
|---|---|
| भाषा | ३१२ |
| धर्म | २८३ |
| काव्य | २५९ |
| विज्ञानशास्त्र | १९१ |
| कादंबऱ्या | १४९ |
| तत्वज्ञान | ११४ |
| वैद्यक | १०९ |
| चरित्र-ग्रंथ | ९२ |
| अितिहास | ७२ |
| गणित व यंत्रशास्त्र | ५६ |
| कायदा | ५१ |
| नाटकें | ३७ |
| कला | ३६ |
| राजकारण | १२ |
| प्रवास | १२ |
| इतर | १६१० |
| | ३४४० |

यावरून काव्य, भाषा, धर्म व कादंबऱ्या या ग्रंथांची निपज अधिक प्रमाणांत होत आहे हें अुघड दिसतें. विज्ञान व शास्त्रीय विषयांचीं १९१ पुस्तकें प्रसिद्ध झालीं, पण त्यांत शिक्षणविषयक किंवा शालेय पुस्तकांचा भरणा विशेष होता. या १९१ पैकी १२० शालेय होतीं. भाषाविषयांतहि ३१२ नवीन ग्रंथांपैकीं २३६ शालेय होते.

———

# परिषद्वार्ता

## कार्यकारी मंडळ

१४ नोव्हेंबर १९३७ रोजीं भरलेल्या सभेंत पुढील दुखवटयाचे ठराव करण्यांत आले:—

(१) जळगांव येथील 'काव्यरत्नावली'चे सुप्रसिद्ध अुत्पादक व संपादक यांच्या निधनाचें वृत्त अैकून कार्यकारी मंडळास दुःख होत आहे. 'काव्यरत्नावली' हें मासिक ५० वर्षें स्वार्थत्यागपूर्वक चालवून व पूर्वीचे महाजनी, टिळक, केशवसुत, बालकवि तों अलिकडील टेकाडे, बेहेरे, 'बी', पटवर्धन, यशवंत, गिरीश, तिवारी वगैरे बहुतेक सर्व कवींना उत्तेजन देअून, तसेंच 'सुभाषित मराठी' हें भाषान्तरात्मक पुस्तक व 'आर्याबद्ध महाभारत' हे ग्रंथ लिहून मराठी साहित्याची त्यांनी जी बहुमोल सेवा केली आहे तिजबद्दल महाराष्ट्र सदैव त्यांचा ऋणी राहील. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या आप्तेष्टांबरोबर व मित्रमंडळींबरोबर कार्यकारी मंडळहि दुःखभागी आहे हें या ठरावाच्या रूपाने नमूद करण्यांत येत आहे.

(२) डॉक्टरीच्या धंद्यांत असतांना देखील साहित्याबद्दल ज्यांच्या मनांत अखंड आवड होती व त्याच्या अभिवृद्ध्यर्थ आणि अुन्नत्यर्थ ज्यांनी पुष्कळ परिश्रम घेतले व स्वार्थत्याग केला, अशा डॉ. गो. रा. तांबे यांच्या निधनाने परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत आहे तें या ठरावाच्या रूपाने नमूद करण्यांत येत आहे.

ही सभा चालू असतां नियामक मंडळाच्या सभासदांकडून संमेलनाध्यक्षाच्या निवडणुकीविषयक आलेल्या मतपत्रिकांतील मतांची मोजणी होअून पहिलीं पांच नांवें निवडून आलीं तीं मतसंख्यानुक्रमें येणेंप्रमाणेः—

(१) बॅ. विनायकराव सावरकर, (२) रा. ब. गो. स. सरदेसाई, (३) श्री. ल. रा. पांगारकर, (४) श्री. भा. रा. तांबे, (५) प्रो. द. वा. पोतदार.

## इतर

परिषदेच्या कार्यालयांत नोव्हेंबरच्या ३० तारखेस श्री. भा. वि. अुर्फ मामा वरेरकर यांच्या नेतृत्वाखाली 'पुरोगामी वाङ्मयाची कसोटी' या विषयावर अनौपचारिकपणें चर्चा करण्यास मंडळी जमली होती. जागा अपुरी असल्यामुळे श्री. वरेरकर यांनी नांवें सुचविलेल्या सभासदांसच बोलविलें होतें. प्रो. वा. म. जोशी, श्री. के. ना. काळे, श्री. श्री. के. क्षीरसागर, प्रो. के. ना. वाटवे, प्रो. द. वा. पोतदार, प्रो. दे. द. वाडेकर, श्री. मो. शा. शहाणे वगैरे मंडळींनी आपले विचार प्रांजलपणें व खेळीमेळीने पुढे मांडल्यामुळे या विषयावर अत्यंत उद्बोधक अशी सांगोपांग चर्चा झाली.

अिंदूरचे कवि व प्रसिद्ध काव्यगायक श्री. य. खं. कुलकर्णी यांच्या काव्यगायनाचा कार्यक्रम ता. २९।१२।३७ रोजीं परिषदेच्या इमारतींत करविण्यांत आला.

अिचलकरंजीचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब घोरपडे यांनी दोन हजार रुपये दर्शनी किंमतीचे ३॥ टक्के दराचे सरकारी कर्जरोखे परिषदेस वर्षोवर्षी व्याज मिळावें या अुद्देशाने

निराळ्या ट्रस्टींच्या नांवें करून दिले आहेत. या औदार्याबद्दल परिषद् त्यांची अत्यंत आभारी आहे.

ता. १६।१।३८ रोजीं भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत १९३७ या वर्षाचा वृत्तांत व हिशेब सादर करण्यांत आले. १९३८ या वर्षाकरिता अंदाजपत्रकहि कार्यकारी मंडळाने तयार केलें आहे.

ता. १६।१।३८ रोजीं सोलापूर येथे राज्यश्री वाचनालयांत डॉ. बाबासाहेब किर्लोस्कर यांच्या अध्यक्षतेखालीं शाखा सभा स्थापन करण्याबाबत पूर्वविचारासाठी सभा भरली होती. यासाठी कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें. ही शाखासभा लवकरच स्थापन होईल अशी अुमेद आहे.

## मध्यप्रांत शाखासभा

या शाखासभेने बॅ. विनायकराव सावरकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविलेलें प्रांतिक साहित्यसंमेलन ता. १२ व १३ डिसेंबर रोजीं भरून अत्यंत यशस्वी रीतीनें पार पडलें. मध्य-प्रांताचे पंतप्रधान ना. डॉ. खरे यांनी या संमेलनाचें उद्घाटन केलें.

## परिषदेचे नवीन सभासद

### तहहयात

१ जोशी, दत्तात्रेय पांडुरंग, दादर
२ नाईक, श्रीधर वामन, हैदराबाद (दं.)

### साधारणांतून तहहयात

३ वैद्य, काशीनाथराव, हैदराबाद (द.)

### हैदराबाद (द.)

४ किर्लोस्कर, गंगाधर कृष्ण
५ श्रीखंडे, देवदत्त विठ्ठल
६ देशपांडे, नारायणराव रामराव
७ भोले, रघुनाथ जयराम
८ नाअीक, लक्ष्मण शेषाद्रि
९ गानू, लक्ष्मण गोपाळ
१० कोरटकर, विनायकराव केशवराव
११ बोरगांवकर, शंकरराव
१२ मुखेडकर, अंबादासराव गोविंदराव
१३ कोरटकर, विठ्ठल केशवराव
१४ नाअीक, वासुदेव कृष्णाजी
१५ नाअीक, विश्वनाथ
१६ प्रधान, सौ. चंद्रिकाबाई
१७ अपसिंगेकर, नरहरराव
१८ नांदापूरकर, नारायण गोविंदराव
१९ नानल, गोविंद भालचंद्र
२० भातागळीकर, शामराव
२१ मसलेकर, रामचंद्र हरि
२२ विंदु, दिगंबर गोविंद
२३ पळनीटकर, पंडितराव
२४ हर्डीकर, गणेश वामन
२५ भाटे, सदाशिव रघुनाथ
२६ सोमण, केशव श्रीधर
२७ जतकर, देवराव दामोदर
२८ जोशी, सीताराम नरहर

### शिकंदराबाद

२९ फाटक, वामन बाळकृष्ण

### माणिकनगर

३० देशपांडे, आप्पासाहेब

### पुणें

३१ पुंडलिक, गंगाधर गोविंद
३२ आंबेकर, विष्णु बापूजी
३३ भागवत, रामचंद्र पांडुरंग
३४ दीक्षित, विठ्ठल नारायण
३५ भोळे, केशव वामन
३६ नेने, गजानन हरि
३७ ब्रह्मे, भैरव शंकर
३८ निरंतर, गंगाधर भाऊराव

३९ दातार, श्रीनिवास माधव
४० जोगळेकर, जनार्दन वासुदेव
४१ पेणकर, दत्तात्रेय बाळकृष्ण
४२ नरवणे, जगन्नाथ अेकनाथ
४३ आठवले, नारायण विष्णु
४४ फाटक, विनायक रामचंद्र
४५ केळकर, मनोहर महादेव

संयुक्तप्रांत

४६ पुणतांबेकर शरयूबाई, डेहराडून

सोलापूर

४७ रेगे, गजानन लक्ष्मण

वांद्रें

४८ कार्णिक, सौ. उषादेवी

परदेश

४९ दाते, शंकर पांडुरंग, अबादान

मुंबई

५० ढवळे, वामन रावजी

दादर

५१ परांजपे, कु. दया
५२ जोगळेकर, जनार्दन गणेश
५३ देशपांडे, रंगनाथ रामकृष्ण

माटुंगा

५४ भावे, यशवंत दत्तात्रेय
५५ वाघ, विनायक रघुनाथ

विलेपारलें

५६ पेंडसे, शंकर केशव
५७ डोंगरे, बळवंत कृष्ण
५८ साठे, दत्तात्रेय बळवंत
५९ जोग, वासुदेव दामोदर

मालवण

६० आजगांवकर, राजाराम अंबाजी
६१ खानोलकर, कृष्णाजी नारायण
६२ रेगे, सीताराम गोविंद
६३ मालवणकर, सीताराम यशवंत
६४ आपटे, गोविंद विष्णु
६५ रानडे, नारायण दिवाकर
६६ वाघ, दत्तात्रेय वासुदेव
६७ आजगांवकर, राजाराम वासुदेव
६८ खानोलकर, वामन पांडुरंग
६९ परुळकेर, महादेव विठ्ठल
७० महाजन, राजाराम विठ्ठल
७१ कामत, रामकृष्ण वासुदेव

मडगांव

७२ विर्जिनकर, पुंडलिक वामन
७३ वैद्य, पांडुरंग गोपाळ
७४ नायक, काशीनाथ दामोदर
७५ सरदेसाअी, यशवंतसूर्याजी सूर्यराव
७६ नाअीक, नरसिंह दामोदर
७७ पैपाळंदीकर, आत्माराम शंभु
७८ कारापूरकर, शंकर जयवंत
७९ भेंब्रेप्रभु, लक्ष्मीकांत व्यंकटेश
८० लोटलीकर, पुरुषोत्तम लक्ष्मण
८१ रायकर, व्यंकटेश अत्ता
८२ नाअीक, दलाल, दत्तात्रेय पांडुरंग
८३ विर्जिनकर, पांडुरंग गोपाल
८४ कारे, दामोदर अच्युत
८५ नायक, केशव अनंत
८६ सावर्डेकर, बाळकृष्ण वामन
८७ गुरुपादप्पा सिद्‌लिंगप्पा
८८ कामत, लक्ष्मण नारायण
८९ पै, दत्तात्रेय व्यंकटेश

पणजी

९० तळावलीकर, यशवंत
९१ देशपांडे, यशवंत बळवंतराव
९२ न्हावेलकर प्रभु, पुरुषोत्तम वि.
९३ भेंब्रेप्रभु, नारायण व्यंकटेश
९४ बोरकर, आत्माराम गोविंद
९५ गायतोंडे, दुर्गा पांडुरंग
९६ नायक, रामचंद्र शंकर
९७ शिरोडकर शेणवी, बाळकृष्ण आत्माराम
९८ सरदेसाअी, व्यंकटेश त्रि. सूर्यराव
९९ केणी, पुरुषोत्तम नागनाथ
१०० पिसुर्लेकर शेणवी, पांडुरंग सखाराम
१०१ भांगी शेणवी, श्रीधर पांडुरंग

१०२ सावर्डेकर, हिरबा विनायक
१०३ दुभाषी शेणवी, दीपा गोविंद
१०४ आगशीकर, बाबूराव
१०५ वैद्य, गोविंद दत्तात्रेय
१०६ नाओीक, बावलो मार्तु
१०७ खवंटे नाईक, जनार्दन उपेंद्र
१०८ मुखटणकर, विठ्ठल सदाशिव

कुंभारजुवें

१०९ नाओीक, नानू रागळो
११० केकरे शेणवी, भालचंद्र फटवा
१११ कामत येळेकर, त्रिविक्रम गोविंद
११२ भांडारे, फटबा भिकू
११३ भांडारे, रामकृष्ण

म्हापसें

११४ प्रभुदेसाओी, अनंत परशुराम
११५ खलप, वामन अनंतशेट

राय

११६ कुवळेकर, शंभु गोविंद

कासावली

११७ केणी, पुरुषोत्तम पांडुरंग

वास्कोडगामा

११८ मेहेता, गणपतराम जेठाराम

---

# साभार स्वीकार

१ सुमन सौरभ—कवि : यशवंत सदाशिव कोरेकल, हैदराबाद (द.); प्रकाशक : आप्पासाहेब देशपांडे, पोस्ट होमिनाबाद.

२ वंदे भारतम्—लेखक : प्रल्हाद केशव अत्रे; प्रकाशकः यशवंत केशव अत्रे, सारस्वत वसाहत, पुणें १; मूल्य १ रुपाया.

३ हिंदुस्थानचा राज्यकारभार—लेखक : राजाराम विनायक ओतुरकर; प्रकाशक : वि. गं. केतकर, अ. वि. गृह, पुणें २; मूल्य २ रुपये.

४ शिवकालीन-पत्र-सार-संग्रह—(खंड३रा) संपादक : शं. ना. जोशी; प्रकाशक : चिटणीस भा. इ. सं. मंडळ, पुणें २; मूल्य २॥ रुपये.

५ फुलोरा—कर्ताः पुरुषोत्तम शिवराम रेगे, प्र.: ज.शि.रेगे, विठ्ठलभाई पटेल रोड, मुं.४.

६ कीर्तनकुमुदिनी—लेखक : बाळासाहेब साठे; प्रकाशकः परचुरे, पुराणिक आणि मंडळी, मुंबई ४; मूल्य १। रुपाया.

७ अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका—लेखक व प्रकाशकः गंगाधर बाळकृष्ण सरदार, ११९।१० सदाशिव, पुणें २; मूल्य ३ रुपये.

८ नागरी लिपी सुधारणा ?–ले. व प्र. : कृ. ना. ठोंबरे, ब्रह्मपुरी, बडोदें; मूल्य ४ आ.

९ शिवचरित्रसाहित्य—(सहावा खंड)–संपादक : गणेश हरि खरे; प्रकाशक : चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें, मूल्यः १॥ रुपाया.

१० कालिदासाची सृष्टि—लेखक व प्रकाशक : माधव दामोदर अळतेकर, विलेपार्ले, मुंबई २४; मूल्य २। रुपये.

११ वाङ्मय, लेखन व जीवित—लेखक, संपादक व प्रकाशक : मारुति अनंत पै, कारवार, मूल्य ३ रुपये.

१२ लेखणीच्या लीला—लेखक : शंकर श्रीकृष्ण देवभक्त; प्रकाशक : कृष्णाजी नारायण सापळे, १५-१७ त्रिभुवन रोड, मुंबई ४; मूल्य १ रुपाया.

१३ उमाडलेल्या भावना—लेखक : दत्त रघुनाथ कवठेकर; प्रकाशक : शं. ना. वैद्य, ९८२ शुक्रवार, पुणें २; मूल्य २ रुपये.

---

# संपादकीय



## 'अनृताचा प्रसार'

गेल्या अंकांत श्री. सुब्रह्मण्यम् यांचा 'हिंदी भाषा व भारतीय राष्ट्रीयत्व' हा लेख त्रिवेणींतून घेअून, भाषांतरून प्रसिद्ध केला. त्यांतील विचारांची शांतपणें चर्चा होअील अशी अपेक्षा होती पण ती फोल होअून त्यांतील अेक दोन चुकीच्या विधानांच्या साहाय्याने 'म. सा. परिषदेच्या संपादकांनी अनृताचा प्रसार चालविला आहे' अशी हाकाटी करण्यांतच माझ्या कांही सन्मित्रांनी आपला आवेश खर्ची पाडला. यांत माझे हितचिंतक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचा भाग अधिक होता. महाराष्ट्र, जोत्स्ना व विहंगम यांतून त्यांनी मला या 'अनृत-प्रसारा'बद्दल जाब विचारला आहे. या गैरलागू वादांत शिरण्याची माझी अिच्छा नाही. श्री. माडखोलकरांप्रमाणे चौकस व जागरूक टीकाकार पहाऱ्यावर असतांना 'अनृत-प्रसार' करण्याची माझी काय हिंमत आहे !

## मुख्य मुद्दे

वस्तुतः लोकमान्यांच्या लेखांत सुब्रह्मण्यम्ना आधार मिळतो कीं नाही हा मुख्य मुद्दा नसून हिंदी भाषेसंबंधी देवनागरीसहि अनोळखी अशा बंगाल, आसाम, ओरिसा, आंध्र, कर्णाटक, मद्रास, पंजाब वगैरे प्रान्तांतील जनतेची बाजू त्या लेखांत जोमाने पुढे मांडिली होती हें टीकाकारांनी ध्यानांत घेअून त्या मुद्यास अुत्तर देण्याचा प्रयत्न करावयास हवा होता. हे मुद्दे पुढे मांडणारा लेख प्रसिद्ध करणे हा अनृतप्रसार खास होत नाही. हिंदी भाषाप्रचाराकडे आमच्या देवनागरी प्रेमामुळे आम्ही बऱ्याच आपुलकीने पाहतों; परंतु प्राथमिक शाळांत हिंदी सक्तीचें करतों असे अुद्गार मद्रासच्या पंतसचीवांनी काढतांच तिकडे जी प्रतिक्रिया झाली, तशीच प्रतिक्रिया वर निर्देशिलेल्या सर्व प्रान्तांमध्ये होअील, हें सदर लेखातर्फे सांगण्यांत आलें. श्री. सुब्रह्मण्यम् यांजप्रमाणे विचार करणारा वजनदार समाज तिकडे आहे व त्याच्या विचारास क्षुद्र लेखून चालणार नाही.

## समारोप

याच लेखावर 'त्रिवेणी'च्या विद्वान संपादकांनी व्यक्त केलेले विचार येथे निर्देशूने त्यांजकडे, या प्रश्नास हटातटाने पक्षभांडणाचें स्वरूप न देतां, विचारवंतांनी लक्ष द्यावें असें सुचवितों. या मुद्यांवर सहमत होणें फारसें कठीण जाणार नाही अशी आशा आहे. या प्रश्नाकडे सांस्कृतिक दृष्ट्या पाहणें प्रस्तुत वादांत अिष्ट नसून त्याचा केवळ अेक राजकीय प्रश्न म्हणूनच विचार करणें योग्य होअील.

(१) भारतवर्षाची अेकी ही केव्हाहि संयुक्त अेकीच राहणार; भाषावार प्रान्त हे त्यांतील घटक होत. संयुक्त व आन्तरप्रान्तीय व्यवहाराकरता अेका भाषेची जरुरी आहे व ती भाषा हिंदी हीच योग्य. कारण ती हिंदुस्थानांतील बहुसंख्य लोक जाणू शकतात, ती भाषा अितर भाषांहून वैभवसंपन्न आहे म्हणून नव्हे.

(२) आपल्या देशांत शेकडा नव्वदहून अधिक लोक निरक्षर आहेत तेव्हा पहिला

प्रयत्न साक्षरतेचा व तोहि मातृभाषेंतूनच व्हावा. हिंदी भाषा न जाणणाऱ्या प्रान्तांतही प्रत्येकास हिंदुस्थानी यावी (Cent per cent. literacy in Hindustani) असा हट्ट धरण्याचें कांहीच प्रयोजन नाही.

(३) विद्यार्थ्यांचें वय ६ ते १२ पर्यंत सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण द्यावें, हें केवळ मातृभाषेतूनच दिलें जावें. दुसरी कोणतीहि भाषा, सक्तीने वा खुषीने, या सहा वर्षांत शिकविली जाऊं नये आणि हल्ली दुय्यम शिक्षणक्रमांत अंतर्भूत असलेल्या विषयांचा बराच भाग या काळखंडांतच शिकविला जावा.

(४) प्राथमिक शिक्षणाची कालमर्यादा सहा वर्षें केल्याने दुय्यम शिक्षणमर्यादा चारावर आणावी व या कालखंडांतहि सर्व विषय केवळ मातृभाषेंतूनच शिकवावे. यांतील पहिल्या दोन वर्षांत मामुली हिंदी भाषेचें शिक्षण द्यावें व अिंग्रजी पुढील दोन वर्षांत व कॉलेजमध्ये शिकवावें.

(५) हिंदुस्थानचे भाषावार विभाग तात्रडतोब व्हावेत व प्रत्येक प्रान्तांतील सर्व व्यवहार, न्यायमंदिरें, विधिमंडळें, शाळा, विद्यालयें व साहित्यनिर्मिति, केवळ मातृभाषेंतूनच व्हावेत.

(६) मातृभाषेचें योग्य स्थान याप्रमाणे पक्कें केल्यानंतर दुय्यम अभ्यासक्रमांत पाहिलीं दोन वर्षें सक्तीने व पुढे खुषीने हिंदी शिकविण्यांत यावे.

(७) शैक्षणिक माध्यम म्हणून अिंग्रजी भाषेचें महत्त्व जरी कमी झालें तरी विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमांत तिचा अंतर्भाव असणें जरूर आहे. कारण त्या भाषेच्या द्वाराच जगाच्या व्यवहारांची ओळख होते. म्हणून अिंग्रजीचा अभ्यास दुय्यम शिक्षणाच्या शेवटीं मामुली व विश्वविद्यालयांत कसोशीने होओील अशी सोय करावी.

शेवटीं त्रिवेणीचे विद्वान संपादक म्हणतात की कांहीहि झालें तरी हिंदुस्थानी व अिंग्रजी अशा दोन अनोळखी भाषांचा अभ्यास अेकदम दुय्यम शिक्षणक्रमांत विद्यार्थ्यांवर लादूं नये, त्यांचा अन्तर्भाव निरनिराळ्या वेळीं करावा.

यावर मला स्वतःस अेवढेंच म्हणावयाचें आहे की तीन भाषा शिकण्याचा जुलूम आमच्यावर कां करावा ? व दोन भाषा जर शिकायच्याच तर मातृभाषा सोडून दुसरी कोणती भाषा शिकावयाची तें विद्यार्थ्यांच्या खुषीवर कां सोपवूं नये ?

## ध्वनिक्षेपण व भाषा

मागील अंकामध्ये प्रा. श्री. वा. रानडे यांचा ध्वनिक्षेपकावर अेक लेख प्रसिद्ध करून या यांत्रिक साधनामुळे भाषेवर, विशेषतः मराठी भाषेवर, जो परिणाम होओील त्या प्रश्नाकडे वाचकांचें लक्ष वेधण्याचा पत्रिकेने प्रयत्न केला. परंतु या महत्त्वाच्या विषयाकडे साहित्यिकांचें जावें तसें लक्ष गेलेलें दिसत नाही. ध्वनिक्षेपणाच्या मर्यादेंत राहून खेड्यापाड्यांत प्रसृत होणारें वाङ्मय व अक्षरद्वारा साक्षर लोकांपुढे येणारें वाङ्मय यांत महत्त्वाचा फरक पडणार यात शंका नाही. या भावी वाङ्मयीन प्रकारांत, कांही काळ तरी, थोड्या वेळांत, कमींत कमी शब्दांत केवळ श्रवणेंद्रियाच्या साहाय्याने सर्व चित्र उभें करणाऱ्या नाट्य, कथा व प्रबंध यांचें महत्त्व राहील. तसेंच या प्रकाराचें शैक्षणिक महत्त्व व त्याचा आमच्या अुच्चारांवर व भाषाप्रघातावर होणारा परिणाम ध्यानांत घेतां जेथे जेथे नभोवाणीचे केंद्र असेल तेथे तेथे त्या केंद्राच्या अधिकारीवर्गांत व नियंत्रकांत भाषाकोविदांची व अुच्चारप्रविणांची योजना होओील अशी खटपट साहित्यसंस्थांकडून होणें जरूर आहे. नाही तर महाराष्ट्रांतील केंद्रांत मद्रदेशीय,

अनुक्रमणिका

बंगालमधील केंद्रांत पंजाबी व हिंदी प्रान्तांतील केंद्रांत महाराष्ट्रीय अशा लोकांची केवळ त्यांच्या यांत्रिक नैपुण्यामुळे नेमणूक होअून या केंद्रांचें भाषाविषयक कार्य अुपकारक होण्या-अेवजी अपकारकच होण्याचा जास्त संभव आहे. यांत्रिक प्रगति व साधनसुलभता यांमुळे ध्वनिक्षेपक यंत्रें किती झपाट्याने लोकप्रिय होतात हें अमेरिकेवरून दिसून येतें. तेथे संयुक्त संस्थानांत ३,१४,००,००० कुटुंबें असून त्यांत २,४५,००,००० कुटुंबांनी हीं यंत्रें घेतलीं आहेत.

## बोलपटनियंत्रण

कांही दिवसांपूर्वी मुंबअीचे पंतप्रधान ना. खेर व गृहमंत्री ना. मुनशी यांना 'मोशन पिक्चर सोसायटी' या संस्थेने बोलपटनियंत्रणाच्या कामांत सरकारने आपल्या संस्थेच्या प्रतिनिधींचें साहाय्य घ्यावें अशी विनंती केली. बोलपटांचा संबंधहि वाङ्मय व शिक्षण यांजशीं निकट असल्याने साहित्यसंस्थांच्या प्रतिनिधींचा सल्ला या बाबतींत सरकारने घेणें अत्यंत आवश्यक आहे. असंख्य पौराणिक, अैतिहासिक व सामाजिक बोलपट निर्माण होत आहेत व त्यांतील शेकडा नव्वद, विशेषतः अैतिहासिक व सामाजिक, वस्तुस्थिति वा समाजस्थिति-दर्शनाच्या दृष्टीने टाकाअूच आढळतात. रजपूत व मराठे यांच्या अितिहासाची हल्लीच्या बऱ्याच बोलपटांत जी दुर्दशा केली जाते, विशेषतः त्या कालांतील समाजस्थिति व कुटुंबांचे आचार यांजबद्दल जी विकृत चित्रें अुभीं केलीं जातात त्याची कल्पना नुकत्याच मोठ्या गाजावाजाने प्रसिद्ध झालेल्या अेक शिवकालीन प्रसंग चित्रित करणाऱ्या बोलपटावरून येते. सुदैवाने 'हंस' व 'प्रभात' या बोलपटसंस्थांनी थोर साहित्यिकांचें साहाय्य घेअून आपल्या चित्रकथा सजविण्यास सुरवात केली आहे. हंसने समाजाच्या जिव्हाळ्याचे प्रश्न नामवंत साहित्यिकांच्या साहाय्याने चित्रपटांत दिग्दर्शित करण्यात स्पृहणीय पुढाकार घेतला असून, प्रभातनेहि आपल्या पहिल्याच सामाजिक चित्रपटांत अशा प्रश्नास हात घातला आहे. कलावन्ताची ध्येयात्मकता, तंत्रमर्यादा, सामान्य प्रेक्षकांची आवड व कमाअी या सर्वांच्या समन्वयाचें अवघड काम बोलपटावर पडतें आणि म्हणूनच सुंदर कलाकृतींचें प्रमाण इतकें कमी दृष्टीस पडतें. तथापि खांडेकर, वरेरकर, अत्रे, आपटे, काळे इत्यादि साहित्यिकांनी लक्ष घातल्यास भिकार बोलपटांच्या चढाओढीच्या संकटांतून ही कला सहज निभाअून जाअील. अशिक्षित व अर्धशिक्षित प्रेक्षकांसमोर बोलपट दाखविले जातात हें ध्यानांत घेअून त्यांचें परीक्षण व्हावें व अशा प्रेक्षकांना शक्य तों सत्यापलाप करणारीं दृश्यें दाखविलीं जाअूं नयेत याची दक्षता ठेवली जावी म्हणून त्यासंगीं साहित्यिक संस्थांनी जागरूक राहिलें पाहिजे व नियंत्रण-समितीवर आपला प्रतिनिधि नेमून घेण्याची चळवळ केली पाहिजे.

## सावरकरांचा प्रचार

या अंकांत बॅ. सावरकरांच्या मध्यप्रान्तांतील भाषणाचा अुतारा देण्यांत आला आहे. त्यांच्या भाषणावरून त्यांचे वाङ्मयीन विचार साकल्येंकरून कळतील. बॅ. सावरक-रांनी प्रचारकाची—आत्यंतिक आग्रही प्रचारकाची—भूमिका कांही बाबतींत कशी घेतली आहे हें त्यांच्या भाषणांत व्यक्त झालें आहे. हिंदुस्थानांतील यादवीच्या काळांतील अितिहासाचे प्रसंग वर्णन करतांना क्रमिक पुस्तकांत सुद्धा परस्परपक्षांच्या क्रौर्याचें वर्णन यावें हा त्यांचा आग्रह समाजविघातक आहे असें प्रस्तुत लेखकास वाटतें. ज्या समाजाशीं गुण्यागोविंदाने वागणें देश-हिताच्या दृष्टीने अपरिहार्य आहे त्यांच्या अैतिहासिक व युद्धाच्या आवेशांत केलेल्या क्रौर्याच्या

गोष्टी सांगून कोवळ्या मनाची जोपासना दुहीच्या बीजावर करणें यास कोणीहि समंजसपणा समजणारं नाही. दुराग्रही लोकांच्या हट्टास आम्ही मान तुकवावी असें कोणीच म्हणणार नाही. परंतु स्वाभिमानास द्वेषाचें खत लागतेंच असें नाही.

## उल्लेखनीय

गेल्या कांही महिन्यांत दोन तीन मासिकांनी कांही सुंदर खास अंक प्रसिद्ध करून नवीन प्रयेस प्रारंभ केला याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. डॉ. केतकर यांच्या निधनानंतर 'लोकशिक्षणा'ने त्यांच्यावरील लेखांस वाहिलेला अंक प्रसिद्ध करून त्यांस श्रद्धायुक्त तिलांजुली अर्पण केला. नागपूरच्या 'अुद्यम' मासिकाने स्त्रियांचा अुद्यम, व 'सह्याद्री'ने समाजवाद अंक काढून अेकाच विषयाचे निरनिराळे पैलू दर्शविणारें वाङ्मय वाचकांपुढे मांडलें. मराठीमध्यें मासिकें चालविणें किती दुर्घट आहे हें 'प्रतिभा' व 'संजिवनी' यांच्या शोचनीय निमज्जनाने सर्वांस कळून चुकलेंच आहे. वस्तुतः 'प्रतिभे'सारखें सर्वांगसुंदर पुरोगामी पाक्षिक निरपेक्ष व निरलसपणाने चालवून श्री. मोटे यांनी मराठी वाङ्मयाची बहुमोल सेवा केली. श्री. कोल्हटकरांचे कष्ट तर जाहीरच आहेत. मासिकें बंद कां पडतात हा प्रश्न विचारार्ह आहे. मला वाटतें याचा बराचसा दोष लेखकांच्या अस्थिर चुंबाचुंबीस (flirting) आहे. कांही काल तरी आपल्या आवडत्या लेखकांचें लिखाण नक्की अमुक अेका मासिकांत येअील अशी खात्री नसल्याने, कोणताहि लेखक कुठेहि आपलें लिखाण सरसहा देत आल्याने, व याचा परिणाम म्हणून मासिकांतील लेखांचा दर्जा महिनोमहिने सारख्याच तोलाचा ठेवणें कठीण झाल्याने, मासिकास कायम गिऱ्हाअिकें मिळत नाहीत. कांही लेखकांकडे मागणी फार होते व याचाच परिणाम भाराभर लिखाण लिहिण्याचा मोह होअून, त्यांतील गुण कमी होत जातात. अुलट थोर लेखकांनी अेकदम 'दगा' देतांच कोणत्याहि लेखकाचा आसरा गाठून अंक वेळेवर अुभा करावा लागतो. याहून तिसरी आपत्ति म्हणजे जें तें मासिक त्याच त्याच लेखकाचें लिखाण छापतें अेवढेंच नव्हे तर त्याच त्याच विषयांवर छापतें. अुदाहरणार्थ असें म्हणतां येअील कीं 'लोकशिक्षणां'त भारदस्त संशोधनात्मक व विवादात्मक, सह्याद्री'त विविध मनोरंजक, 'विहंगमां'त आन्तरप्रान्तीय अशी जर सर्वसाधारण वांटणी वाचक मनांत करतील तर ती पुरी व्हावयास पाहिजे; नाहीतर 'विहंगम' उघडतां 'सह्याद्री'चा भास व्हावा व 'सह्याद्री'चें स्वरूप 'लोकशिक्षणा' प्रमाणें भासावें. (हें केवळ उदाहरणादाखल स्नेहभावाने लिहिलें आहे.) आशय हाच कीं मासिकांचे विषय, दर्जा, मांडण्याची पद्धत यांमध्ये कांहीतरी भेद झाल्यास, व कांही पट्टीचे लेखक अेकदोन वर्षें तरी कायम ठरल्यास हल्लीचें स्पर्धेचें व बेभरवशाचें स्वरूप नाहीसें होअून मराठी मासिकांस स्थैर्यता येअील व ज्या त्या मासिकाचा भक्तगण निर्माण होअील. 'किर्लोस्कर'चें अुदाहरण यांत ध्यानांत घेण्याजोगें आहे.

## अभिनंदन

म. सा. परिषदेच्या शाखा हळुहळू वाढत आहेत. यांत आघाडी मारून शाखासम्मेलन अत्यन्त यशस्वी रीतीने भरविल्याबद्दल मध्यप्रान्त शाखेचें आम्ही अभिनंदन करतो.

## हा अंक

या अंकांतील प्रा. वाडेकर यांच्या शब्दसंग्रहाकडे व पुरोगामी वाङ्मयावरील दोन टिपणांकडे वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों.

मोहन ज्ञानेश्वर शहाणे.

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## मध्यप्रांत शाखा

### घटना

अुद्देश—परिषदेच्या घटनेंतील कलम २ प्रमाणे.

व्याप्ति—संपूर्ण मध्यप्रांत (परिषदेच्या घटनेंतील कलम १४ तील प्रादेशिक विभाग ८ व १४).

[हिंदी मध्यप्रांतांत फक्त परिषदेचा अेक सभासद आहे. त्या विभागांत स्वतंत्र शाखा निघणें शक्य नाही. परंतु मराठी मध्यप्रांताशीं तो विभाग संलग्न करून सर्व मध्यप्रांताची मिळून अेक शाखासभा स्थापन केल्यास हिंदी मध्यप्रांतांत परिषदेचे सभासद खात्रीने वाढतील व तिकडे मराठीचें पाअूल पुढे पडेल. ]

स्थळ—शाखेची मुख्य कचेरी नागपूर येथे राहील.

साधनें—परिषदेच्या घटनेंतील कलम ३ प्रमाणे—परंतु मध्यप्रांतापुरती मर्यादित.

सभासद—परिषदेच्या घटनेंतील कलम ८६ (२) प्रमाणे.

कार्यकारी मंडळ—प्रांतिक शाखेचें कार्यकारी मंडळ खालीलप्रमाणे राहील:—

१ अध्यक्ष, २ अुपाध्यक्ष, १ कोशाधिप, १ सरचिटणीस, २ जोडचिटणीस, ७ सभासद (सर्व साधारण सभासदांनी निवडलेले), ३ प्रतिनिधि सभासद (शाखासभेने मान्यता दिलेल्या मध्यप्रांतीय साहित्यसंस्थांचे ३ प्रतिनिधि). अेकूण १७.

निवडणुकी—दर तीन वर्षांनी अेकदा होतील. म. सा. परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुकी झाल्यानंतर येणाऱ्या जुलै महिन्यांत या निवडणुकी शक्यतोवर होतील. अेकदा निवडलेले गृहस्थ तीन वर्षें अधिकारपदावर राहतील.

पोटमंडळें—निरनिराळीं कामें पाहण्याकरिता कार्यकारी मंडळ पोटमंडळें नेमील.

शाखेची वार्षिक सभा—सामान्यतः जुलै महिन्यांत शाखेची सर्वसाधारण सभा भरेल. शाखेच्या $\frac{1}{5}$ सभासदांनी तशी लेखी मागणी केल्यास अेरवीहि शाखेची विशेष साधारण सभा भरेल. अध्यक्ष वा चिटणीस हे शाखेच्या सभा भरवितील. सभेची सूचना किमानपक्ष सात दिवस पूर्वी दिली जाअील. सभेसाटी १५ सभासदांची निर्णायक गणसंख्या राहील. तहकूब झालेल्या सभेस गणसंख्येचें बंधन राहणार नाही.

कार्यकारी मंडळाच्या सभा—कार्यकारी मंडळाच्या सभेस ५ ही अवश्य गणसंख्या राहील. कार्यकारी मंडळाच्या सभेची सूचना कमींत कमी तीन दिवस अगोदर दिली जाअील. अध्यक्ष व चिटणीस हे जरूर पडेल त्याप्रमाणे कार्यकारी मंडळाच्या सभा भरवितील. कार्यकारी मंडळाच्या ५ सभासदांनी मागणी केल्यास विशेष सभा (कार्यकारी मंडळाची) भरविण्यांत येईल.

का. मं. अधिकार—शाखेचें चालू कार्य व जमाखर्च यांवर कार्यकारी मंडळाच्या प्रत्यक्ष किंवा पोटमंडळाद्वारें पूर्ण अधिकार चालेल. यासंबंधी नियम व पोटनियम (जरूरीप्रमाणे) करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील.

शाखासभेच्या वार्षिक सभेंतील कार्य—शाखेच्या वार्षिक सभेंत गतवर्षाचा जमाखर्च, नव्या वर्षाचें अंदाजपत्रक संमतीसाठी मांडण्यांत येअील. त्याचप्रमाणे कार्यकारी मंडळाने समोर मांडलेल्या कार्याच्या वार्षिक वृत्तांतास संमति दिली जाअील व नव्या वर्षांतील कार्याचें दिग्दर्शन केलें जाईल.

## महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेचीं पहिलीं आठ वर्षे

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं आठ पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, ऐतिहासिक, चरित्र, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक, शंकाचर्चा, सामाजिक इत्यादि विषयवार सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

किंमत—सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह. दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये; परिषदेच्या सभासदांस २ रु. ट. ख. निराळा.

वि. सू.—नवव्या व दहाव्या वर्षांच्या पुस्तकांच्याहि बांधीव प्रती तयार आहेत. परंतु या प्रतींस प्रत्येकीं ४ रुपये पडतील.

चिटणीस, म. सा. परिषद्.

---

## ‘मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास’

### महानुभावअखेर

सदर ग्रंथ म. सा. परिषदेने मुद्दाम बक्षीस देअून लिहवून घेतला आहे. प्रसिद्ध साहित्यिक कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांच्या सुरस लेखणींतून तो अुतरला असल्यामुळे त्याविषयी जास्त गौरवपर लिहिण्याची जरुरी नाही. विषयाच्या महत्त्वामुळे सदर ग्रंथ शाळा, कॉलेजें, वाचनालयें, महाराष्ट्रसाहित्य व भाषाभक्त या सर्वांनी अवश्य संग्रह करण्याजोगा आहे. पुस्तकाचा आकार रॉयल अष्टपत्री, पृष्ठें १२५, उत्तम बांधणी, किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदांस व वर्गणीदारांस बारा आणे. ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा:—

चिटणीस,

म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता ना. गो. चापेकर यांनी प्रसिद्ध केलें.